# ५२१, नारायण पेठ

(कथासंग्रह)

विजय खाडिलकर



ई साहित्य प्रतिष्ठान

# ५२१,नारायणपेठ

(कथासंग्रह)

लेखक श्री. विजय खाडिलकर

vijay.s.khadilkar@gmail.com

१४०३, माझगांव टॉवर्स, म्हातारपाखाडी , माझगांव, मुंबई..१०

दूरभाषः ०२२ - २३७७६८८९ , चलतध्वनिः ९८२१२२२०४२



प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : ३१ मार्च २०१६

# श्री विजय खाडिलकर



कलावंताला त्याच्या कलेहून अधिक वेगळ्या ओळखीची गरजच नसते असे म्हणतात. ई साहित्य प्रतिष्ठानचे वाचक विजय खाडिलकर यांना "खिडक्या" व "धर्म" या कथासंग्रहांचे लेखक आणि वास्तुपुरुष या नाटकाचे नाटककात म्हणून ओळखतात. त्यांच्या तिनही ई पुस्तकांना वाचकांची पसंतीची दाद मिळाली. त्यामुळे हे चौथे पुस्तक. तिसरा कथासंग्रह.

श्री विजय खाडिलकर यांच्या कथा वाचल्यावर हे जाणवते की या लेखकाने आपले लेखन आयुष्यभर जोपासले असते तर मराठीला एक विशेष लेखक मिळाला असता. पण फ़ार विषादाची गरज नाही. बहुराष्ट्रीय कंपनीतून निवृत्तीनंतर त्यांनी आपली लेखनकला जोपासली आणि अनेक कथा, कविता, कथासंग्रह व नाटक असा खजिना वाचकांसाठी उपलब्ध करून दिला. हे पुस्तक म्हणजे त्यांच्या संपूर्ण खजिन्याची एक झलक म्हणता येईल. त्यांचा आजवरचा साहित्य प्रवास खाली देत आहोत.

**खिडक्या, मायबोली प्रकाशन**

**लालबत्ती, अक्षर प्रकाशन**

सरसरती सर. अक्षरमानव

परिक्रमा: शब्दांजली प्रकाशन  हे कथासंग्रह व

वसंतचाहूल: अक्षरमानव  हा कवितासंग्रह

पारंब्या:  अनघा प्रकाशन ..ही कोमसाप स्पर्धेत तृतिय पारितोषिक पात्र कादंबरी..

या शिवाय दिवाळी अंकातून कथा व कविता येत असतात..

श्री विजय खाडिलकर हे जी ए कुलकर्णी यांचे चाहते. त्यामुळे त्यांच्या कथांतून जी एंची झलक दिसते त्याचबरोबर त्याहून वेगळं लिहिण्याची उबळही जाणवते. मानवी नातेसंबंधांतली असहाय्यता आणि सौंदर्य यांचा वेध हे जीएंच्या कथांचं एक महत्त्वाचं वैशिष्ट्य. ते खाडिलकरांच्या कथेतूनही ठळकपणे प्रत्ययाला येतं. कथेला नाट्यापेक्षा काव्यगत सार्वत्रिकता हेही जिएंचं वैशिष्ट्य खाडिलकरांच्या कथेतून जाणवतं.

त्यांच्याचप्रमाणे पात्रांच्यामागची सामाजिक धार्मिक पार्श्वभूमी ठळक करताना काळ आणि परिसर यांत मात्र खाडिलकरांनी स्वतःचा वेगळा प्रांत चोखाळला आहे. विजय खाडिलकरांच्या कथांतून प्रत्ययाला येणारा धर्म हा surrealistic आहे. तो आहेही आणि नाहीही. वास्तव आहे. पण भिंती आणि भितीच्या पलिकडे जाऊन दोन काठांना जोडणारा पूल आणि भिन्न प्रकृतींना जवळ आणणारा pull असे त्याचे स्वरूप जाणवते. सहृदयी वाचकांना भुरळ पडेल असे विजय खाडिलकरांचे कथानक आणि वाचताना रममाण व्हायला लावणारी त्यांची शैली यांचं गारूड वाचकावर खुप काळपर्यंत रहातं.

५२१, नारायणपेठ ही कथा वाचकांना जुन्या वाडा संस्कृतीतल्या मानवी नातेसंबंधांची गुतागुंत दाखवता दाखवता त्या विश्वात घेऊनच जाते.  विसर्जन या कथेत

एका धर्मस्थळावर, नदी काठच्या तीर्थस्थळी, दोन अनोळखी जीव कसे पुर्वप्राक्तनातून एकमेकांच्या जीवनयात्रेत गुंफ़ले जातात त्याचे गूढ चित्रण आहे. योगायोगाच्या गोष्टींतून मानवी हतबलता , पराकोटीची हतबलता पाहून वाचक थक्क होऊन जातो. अशीच भावना अय्या या कथेतून येते. दोन भिन्नधर्मिय मित्रांच्या आयुष्यातला एक घट्ट दुवा विजय खाडिलकर आपल्या सूचक स्टाईलने नुसता झलक दाखवून जातात आणि वाचकाची मति कुंठित होऊन जाते. सोहळा या कथेतून दोन प्रेमी जिवांच्या समांतर आयुष्याचे नाट्यमय एकत्रीकरण होताना पाहून वाचक खाडिलकरांच्या लेखणीचे कौतुक केल्याशिवाय राहू शकत नाही. खाडिलकरांच्या कथा अत्यंता तरल पातळीवर घडणात व संवेदनशील आणि चाणाक्ष वाचकांना मोहवून टाकतात.

विजय खाडिलकरांचं हे ई पुस्तक तुम्हाला कसं वाटलं ते जाणून घ्यायला आवडेल. तुमचा विस्तृत अभिप्राय आल्यास आम्ही ऋणी राहू. ई साहित्य प्रतिष्ठान हे साहित्यावरच्या चर्चेचं व्यासपीठ व्हावं ही मुख्य प्रेरणा आहे. ते तुमच्या अभिप्रायांतूनच साध्य होऊ शकेल.

धन्यवाद

टीम ई साहित्य

लोप पावत चाललेल्या चाळ वा वाडा संस्क्रुति
आणि त्या अनुषंगाने जपलेली शेजारधर्माची नाती
ह्यात मनाने गुंतलेल्या जुन्या पिढीतल्या
ज्येष्ठांच्या भावनांप्रति आदरांजली

लेखक

## कांहीतरी वेगळं..... प्रास्ताविक...

बदल ही सततची प्रक्रिया, सर्वच क्षेत्रातली.. ते स्वीकारावेच लागतात.. तरीही आधी मनावर नकळत झालेले परिणाम आठवणींच्या रुपाने शिल्लकच रहातात; पण फ़क्त जुन्यांसाठी!

साहित्यातही नवीन संकल्पना घेऊन आलेल्या नव्या पिढीला नव्या विषयांइतकीच जुन्या क्वचित कालबाह्य वाटणा-या विषयांमधेही डोकावून पहाण्याची उत्सुकता असावी ; जुन्या

तळघरातल्या अगम्य गंमतीजमती बघाव्या तशी !

म्हणूनच अलिकडे लुप्त झालेल्या वा होऊ घातलेल्या जुन्या प्रथा परंपरा नि त्या अनुषंगाने त्यावेळची सामाजिक स्थिती व मध्यमवर्गीय रहाणीमान ह्याचा परिचय वाचकांना भावेल अशा पद्धतिने करून देणं हाही लेखकांचा उद्देश असावा.. वाडा आणि विसर्जन ह्या सुरवातीच्या दोन्ही कथांमधे तसा प्रयत्न आहे..

'वाडा' ही खरं तर ह्या संग्रहातली शीर्षककथा जी ५२१, नारायणपेठ ह्या नांवाने प्रसिद्ध करावी असा विचार होता.. तेव्हां सुटसुटीत वाटावं म्हणून'वाडा' हे शीर्षक दिलं असलं तरी आताही ते बदलावं असं वाटलं

नाहीच. म्हणून संग्रहाचं नांव मात्र ५२१, नारायणपेठ असं ठेवलं.. जो त्या कथेचा शेवट आहे..

’विसर्जन’ ही दुसरी कथा खरं तर माझ्या लाल बत्ती ह्या अक्षर प्रकाशनने प्रसिद्ध केलेल्या कथासंग्रहातल्या शेवटच्या कथात्रयीतलाच मधला एक दुवा आहे. तरीही ती स्वतंत्र कथा आहे. इच्छुक वाचकांना’न्यूजहंट’ च्या संकेतस्थळावर आधीच्या तीन कथा दिसू शकतील.. हा फ़क्त संदर्भ दिला आहे.. आग्रह किंवा अभिनिवेश नाही..

’सोहळा’ व’अय़्या’ ह्या दोन्ही कथा समकालीन संदर्भासह लिहिल्या असल्या तरी त्यांची पार्श्वभूमि खूपच वेगळी आहे; जी वाचकांना वेगळ्याच वातावरणात घेऊन जाईल अशी आशा वाटते.. एकूणच ई-साहित्यच्या संकेतस्थळावर कांहीतरी वेगळं द्यावं ह्या उद्देशाने ह्या चार कथांचा छोटेखानी संग्रह पाठवीत आहे.. प्रकाशकांना आणि वाचकांनासुद्धा आवडेल अशी आशा,नव्हे खात्रीच आहे!

आधीच्या कथांइतकाच ह्याही कथांना वाचकांचा सकारात्मक प्रतिसाद मिळावा ही अपेक्षा.. धन्यवाद !

विजय खाडिलकर

## अनुक्रम



शीर्षककथा '५२१, नारायणपेठ' ही मूळ 'वाडा' ह्या नांवाने प्रसिद्ध झाली होती.

ॐ

# वाडा

मोदी गणपतीवरून पुढे वळलं कि जुने वाडे जाऊन आता सलग व्यापारी गाळे नि वर छोटया घरकुलांची कॉलनी. अगदी टॉवर नाही तरी रस्ता रूंदीकरणात थोडं मागे गेलेल्या उंच इमारती, बाल्कनीवाल्या. समोर रांगोळी घातलेल्या दिंडया नि त्यापुढच्या सायकली जाऊन दोन्ही कडेनी टू व्हीलरची रांग. मधे बरीच वर्ष लोटलेली. कधीकाळी आपण इथे रहात होतो हेच विसरायला लावण्याएवढी..

प्रयत्न करूनही त्याला खाणाखुणा दिसेनात नि आठवेनात.

कारण''तो'' तिथे नव्हताच! डॉक्टर आठवल्यांचा जुनाट वाडा! पानशेतच्या पुरात ब-यापैकी नुकसान होऊनही पुन्हा उभा राह्यलेला. आतल्या माणसांसकट. पळापळीतून वाचलेली नि पुढे हयात असलेली माणसं त्या ओल्या आठवणी जागवत राह्यलेली! बरीच वर्ष! आता तर त्यालाही वीसावर वर्ष उलटून गेलेली.

तिथे झालेल्या शोरूममधे इलेक्ट्रॉनिकच्या वस्तू; फर्निचर नि तयार कपडे.. सगळंच झकपक. समोरच्या बोळाजवळच्या कोप-यावर पूर्वी असलेला प्रेस आता नाहीच तर तिथे मोटरसायकलची शोरूम.. नि तेवढयाच बाहेरही उभ्या केलेल्या....

अलिकडे कित्येक वर्षात इकडे यायची वेळच आली नव्हती. आता मात्र तो भोवताल निरखत आठवायचा प्रयत्न करत होता; विसरलेला भूतकाळ! खरं तर

पुसून टाकलेला नि थोडाफार सुरकुतलेला; त्याच्या चेह-यावरच्या वयाच्या खुणांबरोबरच.. तरीही आताआता घडल्यासारखा!.....

करकरणारा दिंडीदरवाजा, केव्हांतरी उघडला जाणारा. एरव्ही फक्त मधली झडप उघडून वापरला गेलेला. आत शिरलं कि उजवीकडची खोली कायम कुलूप लावलेली कधीकाळी दरवाजाबाहेर असलेल्या दुकानात उघडणारी. नंतर कोणी आलंच नव्हतं कि मालकांनीच कोणाला दिली नव्हती कोण जाणे.

डावीकडे दिंडीबाहेरच्या डॉक्टरांच्या दवाखान्यामागेच असलेल्या खोलीत मात्र कायमच बदलीवरचा एखादा शाळा मास्तर असायचा. निरूपद्रवी. बि-हाड गांवी ठेऊन एकटाच रहाणारा; घरून आणलेली लोणच्याची बाटली हातात घेऊन बाहेर खानावळीत जेवायला जाणारा नि लाथेनी वळकटी उलगडून झोपणारा. वेळ असेल तेव्हां दिंडीच्या झडपेत रस्त्याकडे तोंड करून पाठमोरा बसणारा. एरव्ही दार कायम बंदच. त्यामुळे बोळात सतत अंधारच. आतमधे चौकाच्या पाय-या उतरलं कि काय तो उजेड...

अंधा-या बोळातच पुढे माडीचा जिना. जिना संपतो तिथे माडीवर दोन बाजूला दोन खोल्या, स्वतंत्र दारं असलेल्या. त्यात गोखल्यांचं बि-हाड. उजवीकडे चौकात खिडक्या उघडणारं स्वयंपाकघर, त्यात बायकांचा राबता. त्यातली मोरीवरची खिडकी कायम बंदच. केव्हांतरी सुमाच्या आई खिडकीकडे पाठ करून, दांतात लांड्या पदराचं टोक धरून चोळी बदलतांना चौकातनंही दिसायचं म्हणून सुमीच ती बंद ठेवायची.

डावीकडची खोली पुढच्या डॉक्टरांच्या दवाखान्याच्या वरच. तिथल्या जमिनीला लागून असलेल्या खिडकीच्या गजांना टेकून केव्हांतरी सुटीच्या दिवशी बंडी घातलेले गोखले वाचत बसलेले दिसत. एरव्ही ती खिडकीही ब-याचदा बंदच असायची.

माडीवरच्या त्या दोन्ही खोल्यातनं गोखल्यांचाच वावर. पण मुलींना पुढच्या खिडकीशी यायला बंदी होती. दवाखान्याच्या वरच असल्यामुळे असेल पण मालकांनीच घातलेली बंदी!

मुलींच्या आईलाही नाही आवडायचं तसलं कांही. ती कोकणातली होती. म्हणायची;'बुधवारात बसलात का काय तुम्ही कळवाटणीगत? विडयानी तोंडं रंगवून खिडक्यातनं बसायला.'

फार लागट बोलायची. काय बिशाद पोरी खिडकीशी येतील. आणि येणार तरी कसं!

अंगभर साडी तर हवी. आडव्या बांध्याच्या सुमीला कायम स्वस्तातल्या हातमागाच्या पाचवारी सुती साडया, लांडया नि तोकडया. म्हणून तिचा पदरही तोकडाच; जेमतेम मानेभोवती गुंडाळल्यागत. पाठ ब्लाऊजने झाकली जाईल तेवढीच. शिक्षण नाही म्हणून स्वतःची कमाई नाही तेव्हां आईवडिल देतील तेच.

कुठे एखादढुसरा दाखवायचा कार्यक्रम झाला तेव्हां आईचं ठेवणीतलं नऊवारी गोल करून नेसलेली. विजोड रंगाच्या ब्लाऊजसह!

धाकटी अजून फ्रॉकातच होती. आई घरात नसतांना कधीकधी बाबांच्या जागेवर खिडकीच्या गजांना टेकून पाठमोरी अभ्यासाला बसायची.

सुटीच्या दिवशी दिंडीला लागून असलेल्या दगडी ओटयावरनं केव्हांकेव्हां प्रेसच्या मालकांनी पाठवलेला मावळी गडी हाताचा रंग पुसत गोखल्यांना आवाज द्यायचा; खालूनच..

'ओ अन्नाशेट, लौकर चला. भाऊसायबांनी बोलवाय सांगितलय. काम अर्जंट हाय.'

‘आत्ता? काय काम काढलंय एवढं?’ पेपराची घडी करत गोखले उठायचे.

‘हां. त्या कसल्या कार्यकरमाची पत्रिका.. त्याची दोन रंगातली कवरं करायला लागलोय म्या.

ह्ये काय येका रंगाचं काम झालंया. वाळत ठेवलंया म्या. आता दुसरा रंग घ्याया जातोय. यावा लौकर पलटी माराया.’

स्क्रीनवर दोनरंगी कव्हरांची छपाई हे त्यांचं काम नव्हे. तेसुद्धा’पलटी’ मारायला म्हंजे कार्ड सुटी करून वाळवायला!

बिचारे गोखले दोन पैसे जास्त मिळतील म्हणून मग चष्म्यासकटच पट्टयांचा लेंगा नि बंडीवर खाली उतरायचे. सुमी हातात त्यांचा एका खिशाचा नि अर्ध्या बाहयांचा शर्ट पुढे करायची.

‘राहू दे ग. आज सुटीच्या दिवशी कोण बघतंय मला.’ सुमी आत जायची.

प्रेसवाले गोखले म्हणत त्यांना. म्हणजे प्रेस त्यांचा नव्हता. रस्त्यापलिकडे बोळात असलेल्या कुलकर्ण्यांच्या प्रेसमध्ये ते खिळे जुळवायलाच होते म्हणून. पण इतरही बरीच कामं करायचे. प्रुफंसुद्धा तपासायचे. प्रेसच्या मालकांचा भरोसा होता. कारण तरूणपणी गोखल्यांचं वाचन चांगलं. त्यामुळे साहित्यातली जाण होती त्यांना. म्हणून एखाद्या चांगल्या प्रकाशकाचं पुस्तक छापायचं तर गोखलेच लागत मालकांना.

शिवाय लग्नसराईत पत्रिकांचं काम आलं तरी मजकूरात चूक न करता गोखलेच जुळवून देत.

पुढे डीटीपीची सुरूवात होईपर्यंत ते मग रिटायर्डच झाले. त्या आधी गोखल्यांना इतर कामं करावी लागत. जास्त करून मग स्क्रीनवर पत्रिकांची रंगीत छपाई. कधीकधी तर बाहेर ते पत्रिका वाळवत बसलेलेही दिसायचे. चष्म्यामुळे

वाचन कमी झालं तशी प्रुफंही जमत नसत. मग कधी बाइंडरजवळ बसूनसुद्धा मदत करावी लागायची; केवळ गरजेपोटी. मालकांनी आधीच्या कामाची दखल घेऊन त्यांना कांही दिवस ठेवलेलं. फक्त दिवसातून ब-याच वेळा मधेच समोर घरी जाऊन चहा पिऊन यायचे तेवढं सोडलं तर मालकांना तक्रारीला जागा नव्हती.

ह्या गोखल्यांच्या मुलींपैकी थोरली सुमी सुमार रूपाची नि मंगळाचीही म्हणून बिनलग्नाची नि त्यामुळेच वाढल्या वयाबरोबरच वाढत्या शरिराची. म्हणजे आनंदच सगळा. मुलाची वाट बघतांना चुकून उशिरा झालेली धाकटी अजून शाळेत नि फ्रॉकातच.. आईचं लोकांच्या पोळया लाटणं नि बापाचं सायकलवरनं सकाळी पेपर दूध नि मग प्रेसमधले खिळे जुळवणं. सावली पायांखाली घालून अनवाणी पाय पोळत कितीतरी वर्ष हेच करत आलेले कायम तीन मुलींच्या संसारात काय नि कसं पुरं पडणार ह्या विवंचनेत असलेले. दोघंही!..

मधली जाई लग्न होऊन ब-या ठिकाणी पडली.. रूपाच्या जोरावर मागणी आली म्हणून. हुंडयाशिवायच. सुमाच्या आईला त्याची रूखरूख लागून राह्यलेली. कशी भरपाई करणार!

दिवाळसणाच्या निमित्ताने तरी कांहीतरी द्यावंसं वाटायचं.

‘अहो. दिवाळीला जावयाला कांहीतरी द्यायला हवं.’

‘दे कायतरी. नाहीतर मला तिच्याच लग्नात आलेलं शर्टाचं कापड दे.’

‘अहो दिवाळसणाचं म्हणत्येय मी. अंगठी नाही झेपणार. पण निदान चांदीचं भांडं तरी द्यावं का नाही? हुंडापांडा न देता पोरगी उजवल्ये. बोलली नाही कधी तरी तिला सासरी ऐकून घ्यायला लागतच असेल ना. आता तरी काहीतरी भरपाई करावी म्हणत्ये.’

‘कसं जमणार? शंभर रूपयेसुद्धा जास्तच. कुठून आणणार?’

‘उचल करा मालकांकडनं.’ ती तर आधीचीच होती!

हे सारं सुमीच्या कानांवर पडायचं. आईबाबा केव्हांतरी येणा-या जावयाचं असं कौतुक करण्यात मग्न नि त्यामुळे सुमी एकाकी झालेली.. ईर्षा नि

असूया वाटून. शिवाय शरिराची मागणी असणारच ना. मग आपले पिचपिचे डोळे फिरवीत कायतरी चाळा म्हणून चौकाकडच्या खिडकीशी उभी राहून सतत कायतरी खात रहायची. मंडईचं काम होतंच तिच्याकडे.. येताजाता पेरू नाहीतर जाम असं कायतरी परवडणारं आणायची नि खात रहायची.

घरात असली तर आई तिला म्हणायचीसुद्धा.

'काय ग सारखी खा खा सुटलीय तुला. चोहोअंगी सुटत चालल्येस त्याचं तरी भान ठेव. पस्तीशी पार लग्नाची मुलगी तू.. कधी कळायचं तुला?'

'न का होईना लग्न. मी आपली खाऊनपिऊन बरी आहे.'

'किती दिवस? आमच्या माघारी कोण गिळायला घालणाराय्.'

ते तेवढंच रहायचं मग. समजून उमजून आई तिला ह्याहून जास्त कांही बोलायची नाही; म्हंजे बोलू शकतच नव्हती. लग्नाची रहायली ह्या अपराधी भावनेने असेल.

चौकापलिकडच्या खिडकीतल्या; नुसताच शरिराने वाढलेल्या मालकांच्या वेडसर जयंताला चिडवून दाखवीत खायची. तो मग ओरडा करायचा. मालकिणबाईना एक काम..

बोळातल्या गोखल्यांच्या माडीच्या जिन्यापलिकडे दोन्ही बाजूला दोन लांबोडक्या सिंगल खोल्या. मधे पडदा लावून दोन भाग केलेल्या. पुराच्या नुकसानीनंतर मधल्या भिंती घातल्याच नव्हत्या मालकांनी. खोल्यांना कुलपं घालायला दारं होती हे काय कमी.

त्यातल्या एकात वयस्कर पुरंदरे मामी. बि-हाड गांवी ठेवून नोकरीसाठी आलेल्या भाच्यासह रहायच्या. नणंदेशी फारसं सख्य नसलं तरी मामीनी भाच्याला ठेवून घेतलेला. शांताराम वैद्य का कायसं नांव त्याचं. तो भोसरीला का कुठे कारखान्यात शिफ्ट ड्यूटी करायचा. कधीकधी डबल शिफ्ट. त्यामुळे दिवसा घरी फारच कमी वेळा असायचा. मधेच न चुकता जोडसुटी साधून

गावी जाऊन यायचा. केव्हांतरी फॅक्टरीतनं बदली मिळवायसाठी मुंबईला कंपनीच्या ऑफिसात जाऊन यायचा. अजून जमत नव्हतं कांही..

दुस-यात ताराबाई परांजपे शाळेतनं रिटायर्ड झालेल्या प्राथमिक शिक्षिका. बाबूराव परांजपे ऑर्डिनन्स फॅक्टरीत मेकॅनिक का कायसे होते. सांगायचे मात्र इंजिनिअर म्हणून. कोण जाणे. खडकीला लांब सायकलवरनं जा ये करायचे. त्यामुळे एकदा अॅटॅक येऊन रिटायर्ड व्हायच्या आधीच गेलेले. बाई सुस्थितीत होत्या. सासरी गेलेल्या मुली भेटून जायच्या.

किशा परांजपे त्यांचा धाकटा, फारसं शिक्षण न झालेला दीर. केळशीहून का कुठनं आला तो कुठेतरी जिन्याखालच्या खोलीत राहून आचारीकामं करायला लागला. छोटीमोठी कंत्राटंसुद्धा घ्यायचा. तेव्हां कॅटरर ही जमात उगवली नव्हती. तो कधी स्वतःच जाऊन करायचा तर कधी मोठया कॉन्ट्रॅक्टरकडे जायचा. हातात बुंदी पाडायचा झारा नि कागदाच्या पुडीत मोतीचुराचे लाडू घेऊन तो भेटायला यायचा. ते ताराबाईंना खरं तर आवडायचं नाही.

पण पानशेतच्या वेळी तेव्हां लहान असलेल्या जयंतासह मालकिणबाई ना घेऊन सदाशिव पेठेत त्याच्याच जिन्याखालच्या खोलीत रहावं लागलेलं. शिवाय आजारपण आलं तर येऊन चौकशी करायचा. मग म्हणायचा,

'वैने, तू आता लेकींकडेच जाऊन का -हात नाय्यैस? कांही झालं तर बघायला कोणाय हिते?'

'जावईमाणसांकडे? बरं दिसतं का ते? पोरींना टोमणे ऐकून घ्यावे लागायचे सासरी. माझी मी बरीय हितेच.'

'अगे, मग कोकणात तरी जायचंस. पडकं असलं तरी घर आहे. शेजाराला उरलेसुरले कोणतरी परांजपे असतीलच.'

'काय करायचेत ते! पाणी काय हितेई पाजीलच कोणी तरी. तुम्ही तेव्हां लेकीना कळवा म्हंजे झालं. उरलेली वर्ष काढीन हितेच.'

तो मग जातांना खिडकीशी असलेल्या जयंताला ह्या-याच्या हातानेच टाटा करायचा. जयंताला बरोबर समजायचं कि आता लाडू मिळणार!

ताराबाई मग लाडू जयंताला त्याच्या आईच्या हातीं वर पाठवून द्यायच्या. तो वर खिडकीशी येऊन थांबायचा नि पायच्या उतरून चौकात वाळवण घालायला येणा-या ताराबाईंना चाचरत बोलायचा तरी मतितार्थ कळायचा.

'गोडगोड लाडू. ताराकाकी तुम्ही किती चांगल्या आहात.'

त्या हंसून घरात जायच्या. कधी गोखल्यांच्या मुलींना द्यायच्या.

रिकामटेकडी सुमी. तिला विरंगुळा कांहीच नव्हता. रस्त्याकडच्या खिडकीत यायला बंदी म्हणून मग चौकातल्या खिडकीशी उभी राहून वेडयाला चिडवत रहायची. त्याला दाखवून दाखवून लाडू खायची. तो चिडायचा नि तिच्यावर ओरडायचा ते चौकातनं जाणा-यांना दिसायचं. तो बालबुद्धिचा हे लोकांना माहित होतं. पण सुमी मुद्दाम तसं करायची. मालकिणबाईंना बघितलं कि ती घरात पळायची. त्या बिचा-या मग ओरडणा-या जयंताला शांत करायसाठी वर जायच्या.

पण कधी पहिली पाळी करून शांताराम आला तर मात्र चार वाजता आधी तोंडाला मशेरी लावून संडासला नि मग बाथरूममधे अंघोळीला. केसाळ छातीचा चाळीशीला आलेला प्रौढ शांताराम नुसता टॉवेल गुंडाळून बाथरूमच्या बाहेर आला कि सुवासिक साबणाचा वास दरवळायचा. तो वळून बोळात शिरेपर्यंत त्याच्या गो-या उघडया पाठीवरचे पाण्याचे ओघळ वरनं सुमी एकटक पहात बसे. तो केव्हां केव्हां वर बघायचा. सहेतुकपणे. त्याला काय सुचवायचं तोच जाणे. नुसताच आंबटषोक. तो कधी स्वतःशी तर कधी वर बघून हंसायचा.

हे बहुतेक जयंताला समजायचं. तो मधेच विचित्र आवाज करून कायतरी बोलायचा.

खाली मालक दवाखाना उघडून बसलेले नि मालकिणबाई आत चहाच्या तयारीला लागलेल्या. पुरंदरे मामी हातात पितळी फुलपात्रात तांदूळ नि वर

कुंकवाची कोयरी घेऊन देवळात कथेला गेलेल्या नि समोरच्या ताराबाई कुलूप लावून शिकवणीसाठी बाहेर पडलेल्या. मधेच चहासाठी घरी येणा-या गोखल्यांची नाहीतर शाळेतनं परतणा-या धाकटीची भीति वाटायची म्हणून सुमी फारशी खाली यायची नाही.

पण कधी शांताराम अंघोळ करून वर बघत घरात जायसाठी बोळात शिरला कि वर उभी असलेली सुमी समजायची. दोन्ही खोल्यात कोणी नसल्याचा तो इशारा समजून, चौकात ठेवलेल्या कच-याच्या डब्यात कायतरी टाकायचं निमित्त करून सुमी बोळातल्या जिन्याने दोन्ही दरवाजाकडे बघत यायची. ताराबाईंच्या घराला कुलूप. दिंडीतल्या बारक्या झडपेजवळ बाहेर तोंड करून कोणी असलं तरच. एरवी ती मामींच्या घराकडे बघत चौकाच्या पाय-या उतरायची तेव्हां शांताराम नेमका गुंडाळलेल्या टॉवेलनेच दोन्ही जांघा पुसत असायचा; तोंडाने शिळ घालत. ती परत फिरतेय तोवर तो उघडया केसाळ छातीवर पावडर मारत असायचा किंवा आरशातनं दरवाजाकडे बघत भांग पाडत असायचा. हा त्याचा रोजचा क्रम होता. पण दुसरी पाळी नसेल तेव्हां.

कानशिलं तापलेली सुमी मग वर जाऊन पांघरूण घेऊन झोपून रहायची. तेही समोरच्या खिडकीकडे पहात. बाप चहासाठी आला तरी उठायची नाही. तिची अस्वस्थता समोरच्या वेडया जयंताला बहुतेक समजायची. तोही मग अस्वस्थ व्हायचा नि सुमीला'इकडे ये' अशा खुणा करायचा.! ते चौकातनं मालकांच्या घरापाठी मागच्या बाजूला जाणा-या कुणाकुणाच्या नजरेला पडायचं. वेडा म्हणून तिकडे दुर्लक्ष व्हायचं.

जयंता; मालकांचा वय वाढलेला वेडा मुलगा.. वेडा म्हणजे बौद्धिक वाढ कमी असलेला. शिवाय बोलण्यातही व्यंग. चौकापलिकडे माडीवरच्या खोलीत कायम रिकामा बसलेला. कोंडून ठेवल्यासारखा. म्हणून जास्तच वेडा वाटणारा. त्याला एकटयाला बाहेर जाऊ देत नसत आणि बरोबर न्यायला घरात तिसरं माणूसच नव्हतं.

वरखाली गज असलेल्या दुहेरी खिडकीत जमिनीजवळच्या लोखंडी गजात डोकं घालून लहान मुलासारखा बसून असायचा. तिथेच झोपायचा नि मधेच झटका आल्यागत किंचाळायचा त्याच खिडकीशी येऊन.

अलिकडच्या खिडकीकडे हातवारे करत कांहीतरी सांगायचा प्रयत्न करायचा. पण ब-याचदा शब्दच फुटायचे नाहीत. फुटले तरी अर्धवट, अगम्य. वाटायचं कि आता फिटबीट येईल कि काय. त्याच्या ओरडयाला कंटाळून रोज सकाळी हजामतीसाठी येणारा शिवा यायचा बंद झाला. न जाणो एखाद दिवशी दाढी करतांना तोच वस्तरा घेऊन उलटला तर? ह्या भीतिने.

खालच्या खिडकीत खुर्चीत बसलेल्या डॉक्टरांची नि वर घाण करतो म्हणून जमिनीवरच गोणपाटावर बसवून जयंताची अशी दुहेरी हजामतीची प्रथा मग बंद पडली. तरी त्याला सोपानाने रेझरने दाढी करायला शिकवलं. आधी जयंताला आरसा धरायला सांगून स्वतः केली नि मग त्याला आरसा दाखवून रेझर धरायला शिकवलं. शिकला हळूहळू.

हा वयस्कर सोपानकाका त्यांच्या घरासाठी सबकुछ होता. पण कामं झाली कि बाहेर दवाखान्याच्या खोलीतच त्याचा वावर असायचा. तरीही त्याचं जयंताकडे लक्ष असायचं. तो अलिकडच्या खिडकीकडे नाहीतर चौकात बघून असंबद्ध असं कायतरी ओरडायचा. हे सोपानला माहित होतं बहुतेक. अलिकडच्या खिडक्या मग बंद व्हायच्या. मालकीणबाई होत नव्हतं तरी जिन्याने वर जाऊन आधी खिडक्या बंद करायच्या नि मग रडवेल्या होऊन त्याला शांत करायचा प्रयत्न करायच्या.

बापाचा अशावेळी कांही उपयोग नसायच्या. तो आयुर्वेदिक डॉक्टर. दुपारी घरी आल्यावर इंजेक्शन देऊन झोपवून ठेवायचा.. प्रॅक्टिस फारशी चालत नव्हतीच.

लोकं म्हणजे वाडयातली;'पाण्याच्या पैशानी बांधला वाडा. आता वारसच वेडा नि करतोय घराचा आखाडा' असं कायतरी प्रासात्मक बोलत..

चौकापलिकडच्या डाव्या कोप-यातला जिना चढल्यावर माडीवरच्या खोलीत जयंताचा मुक्काम.. त्याला अलिकडे बहुदा शारीरिक वासना जाणवायला लागली असावी. पण कळायचं कांहीच नाही. मग लेंग्याच्या खिशात हात घालून चाळे करायचा नि कायतरी बडबडायचा. अलिकडच्या खिडकीतल्या सुमीकडे पाहून. बाप नुसतं घरात बसण्याऐवजी दवाखान्यात जाऊन मेडिकल जर्नल वाचत बसायचा. प्रॅक्टिस नसल्यामुळे भाड्यावर घर चालवायला लागायचं.

पुराच्या पाण्यात किरकोळ सामान वाहून गेलं तरी जुन्या जड लोखंडी ट्रंका जागच्या हलल्या नाहीत. मालकिणबाईंचे बरेचसे दागिने वाचले; तरी अलिकडे कमी झाले होते; असं पुरंदरे मामी ताराबाईंना सांगायच्या.

‘असेल बाई. काय करणार. पदरात हे पोर. खर्च तर भागायलाच हवा ना.’

खालच्या खिडकीशी जमिनीवर बसून व्यंकटेश स्तोत्र वाचत असलेल्या मालकिणबाईंकडे पाहून मामी मग नुसताच सुस्कारा सोडायच्या. मालकिणबाई सदा रडवेल्या दिसायच्या. जयंताचं लग्न व्हावं, त्याची काळजी घेणारं कोणीतरी असावं असं वाटायचं त्यांना. पण ते कसं होणार, आपल्या माघारी ह्या वेड्याला कोण बघणार; ह्या काळजीने मग त्या सतत व्यंकटेश स्तोत्र म्हणत रहायच्या. कधी कधी जोरजोरात. डॉक्टर घरी नसले कि खालच्या खिडकीशीच त्यांचा मुक्काम असायचा बहुतेक वेळा.

बोळातनं डॉक्टर येतांना दिसले कि त्या आत.

'आणखी एखादा मुलगा असता तर ह्याची काळजी घेता!' असं त्या ताराबाईंना चौकात आल्या कि बोलून दाखवीत. शिकलेल्या असल्यामुळे ताराबाईंना माहित असावं कि डॉक्टरांनीच मुद्दाम तसा प्लॅन केला असावा. कारण कदाचित् दुसराही तसाच झाला तर.. मग ह्या म्हाता-यांचे हाल बघवले नसते. पण हे मालकिणबाईंना कसं सांगणार.

‘ते काय आपल्या हातात नसतं, जयूच्या आई.’

‘पण हा एकुलता नि असा! लग्नकार्य कठीणच नि दुसरं कोणी बघणारं नाही. कसं होणार ह्याचं आमच्या मागे!’

‘अहो, ज्याने जन्माला घातलंय् तोच घेईल ना त्याची काळजी. एखादी अडलेली मुलगी येईलही सांगून.’

‘कोण जाणे! पण आपण कसं विचारणार कोणाला?’

त्यांच्या डोळयांसमोर चटकन् सुमी येत असावी बहुतेक.

ताराबाई समजल्या तरी गप्पच रहायच्या.

हे केव्हांतरीच.. एरव्ही बोळाच्या दोन्हीकडच्या बि-हाडातल्या बाया समोरासमोर आपापल्या दारात बसून भाजी नाहीतर तांदूळ निवडत गप्पा मारायच्या. त्यामुळे जयंताच्या ओरडयाकडे त्यांचं आधी लक्ष जायचं. तेवढयापुरता विषय बदलायचा कि पुन्हा सुरू.

तुळशीबागेत कांही नवीन पाह्यलं कि मामींची टकळी सुरू. मूलबाळ नाही तरी सतत संसारात गुरफटलेल्या. त्यांचा तो आवडता विषय. आणि ताराबाईंचा रेडिओ; त्यावरची मराठी गाणी किंवा  मग आपली आवड वगैरे. क्वचित’अलका’ ला मराठी सिनेमा पाह्यला कि त्याची चर्चा.

बोळातनं मधेच कोणीतरी मागे जायचा. चौक ओलाडून मालकांच्या माडीला वळसा घालून मागच्या घरात. तिथे बैठया पत्रयाच्या खोल्यात एकदोन निरूपद्रवी बि-हाडं होतीच; त्या मास्तरासारखीच. चौकापलिकडे असलेल्या माडीच्या घरात मालकांचा वावर. पूर्वी पाय-यांजवळच म्हणे तांब्याचं मोठं घंगाळ कायम भरून ठेवलेलं असे. घरात जातांना पाय धुवायसाठी. सगळेच त्याचा उपायोग करायचे.

पूर्वी वीज येण्याआधी पाय-यांच्या दुस-या बाजूला एका खांबावर टांग्यातल्यांसारखा काचेचा दिवा होता. त्यात रोज संध्याकाळी त्यावेळी तरूण असलेला सोपान पाय वर करून कंदील ठेवीत असे. आता तिथेच मालकांनी एक पंचवीस पॉवरचा बल्ब लावून ठेवलेला. चौकातून मालकांच्या घराला वळसा घालून पाठीमागे जाणारे भाडेकरू उशिरा आले तर आपापल्या बॅट-या घेऊनच जायचे.

चौकात डावीकडे गोखल्यांच्या खिडकीखाली छपरावर पत्रे टाकलेलं बाथरूम नि त्याच्या बाहेर पाणी तापवायचा बंब होता. दिंडीजवळ झोपणारा सोपान म्हणजे मालकांचा गडी कम कंपाउंडर कम मदतनिस ते काम करायचा. मालकांना गरम पाणी पितळी बादली भरून घरातल्या बाथरूमात द्यावं लागे. मात्र नंतर सोपान जयंताला खाली आणून बाथरूमात कोंडून बाहेर उभा रहायचा. तो एक रोजचा तमाशा होताच.

पानशेतच्या पुराच्या पळापळीत ते दोन्ही बहुतेक चोरीला गेले का वाहून गेले. आता गॅससुद्धा परवडत नाही म्हणून स्टोव्हवर पाणी तापवून पत्र्याच्या बादलीतनं गरम पाणी बाथरूममधे यायचं. वय झालेल्या सोपानकाकालाही आता पितळेची बादली उचललीच नसती..

कालाय तस्मै नमः..

बाजूलाच दोन संडास होते. एक कुलूप घातलेला खास मालकांसाठी. भाडेकरूंसाठी पूर्वी म्हणे मालकांच्या घरामागे रिकाम्या बखळीत मागच्या भिंतीला लागून पाटयांचे संडास होते. नंतर पडीक झालेले.

बाथरूमच्या छपरावर ब-याचशा फांद्या येणारं एक शेवग्याचं झाड बाथरूमला लागूनच होतं. मुळाशी जास्वंद नि सदाफुलीची चार फुलझाडं घेऊन उभं असलेलं. सोपानकाका फुलं काढून मालकिणबाईना नेऊन द्यायचा; पूजेसाठी. डॉक्टरांनी पूजा कधी केलीच नसावी.

वरनं जयंता बोटं दाखवून' ते लाल लाल.. जासुंदी जासुंदी..' असं अगम्य बडबडायचा.

सुमी वरनंच खिडकीतनं काठीला खिळा लावून नाहीतर केव्हांकेव्हां तर हातानीच शेवग्याच्या फांद्या जवळ घेऊन शेंगा नाहीतर मग भाजीसाठी कोवळा पाला काढायची. ते बघूनही जयंता ओरडायचा. ती एखादी शेंग त्याला छडीसारखी उगारून दाखवायची ते खालच्या खिडकीतनं मालकीण बाई बघायच्या पण बोलायच्या मात्र नाहीत. वरमल्यागत सुमी मग त्यांना वरूनच विचारायची.

' काकू, तुमच्यासाठी काढू का दोन चार?' त्या मान डोलवायच्या.

त्या द्यायच्या निमित्ताने मग एखाद्या दुपारी डॉक्टर घरात नसतील तेव्हां, एरवी कधी न येणारी सुमी मालकांच्या घराच्या पाय-या चढायला लागायची. ते वरनं बघणारा जयंता खूष व्हायचा. चौकात वर्दळ नाहीसं बघून हातात छडीसारखी शेंग धरून ती पाय न वाजवता जिना चढून वर जायची जयंताला चिडवायसाठी. कि दुस-याच कशासाठी? शेंगांचं निमित्त!

दोनचारदाच झालं असेल पण तेव्हां जयंता बहुतेक तिच्या अंगाशी झोंबलेला! चुरगळलेली लांडी साडी सारखी करत ती धापा टाकित चौकातला जीना उतरली तेव्हां पायखान्याकडे जाणा-या पुरंदरे मामींच लक्ष गेलंच. ती मग लगबगीने आपल्या जिन्याकडे गेलेली त्यांनी पाह्यली. त्यांनी मालकांच्या वरच्या खिडकीत बघितलं तर जयंता उघडा उभा, नुसत्या चडडीवर!..

एकदा कामं आवरल्यावर मालकिणबाई खालच्या खिडकीच्या गजांजवळ टेकून जोरजोरात व्यंकटेशस्तोत्र म्हणत होत्या. त्यांच्या उच्चारात अस्वस्थता होती. त्यांना कांही संशय आला कि काय, कोण जाणे पण त्या जरा जोरातच वाचत होत्या.

वरती जयंताही खिडकीशीच उभा असलेला पण समोर बघून कांहीतरी बडबडत. म्हणजे बहुतेक सुमीकडे बघूनच. त्याची अस्वस्थता वेगळीच. अलिकडे जास्तच वाढलेली.

समोर सुमीही खालच्या खिडकीच्या आडोशाला नुसतीच बसून असावी बहुतेक. का कोण जाणे पण कदाचित् रडतही असावी. बहुतेक घरातली मंडळी आपापल्या कामासाठी बाहेर. दोघी बाया सोडून.

‘मंडईत गेलावतात का ताराबाई? खूप दिसत्येय पालेभाजी.’

‘मोठ्ठी जुडी होती. वाटलंच तर जयूच्या आईला देईन थोडी. त्या कुठे बाहेर जात नाहीतच. तो सोपान काय आणिल तेच. आणि शिजून केवढीशी होईल होऽऽऽ..’

‘एका जुडीसाठी मंडईपर्यंत गेलात? धन्य झाली बाई तुमची!’

‘छे हो. एका जुडीसाठी मंडईत कशाला जाईन? तुम्ही गेला होतात वाटतं? काल देवळातनं आलात तेव्हां हातात पिशवी पाह्यली.’

‘नाही हो. इथेच घेतल्या भुईमूगाच्या शेंगा गाडीवर, उकडायसाठनं.. दादूला आवडतात ना.’

त्या शांतारामाला दादू म्हणून हाका मारीत. मग म्हणाल्या;

‘झाल्या तर जयंतालाही देईन. खिडकीशी बसून आस्तंय् पोर दिवसभर!’

‘द्याच त्याला. विरंगुळा म्हणून. तो मग वाकुल्या दाखवत बसेल, समोर बघून.’

‘समोर’ वर जोर देत हंसून ताराबाई म्हणाल्या. नि पुढे मुद्दाम म्हणाल्यागत म्हणाल्या;

‘तुमचा दादू तरी असतोय कुठे घरी शेंगा खायला. आसतोय तेव्हां पुस्तकं तरी वाचतोय नाहीतर..’

त्यानी वाक्य अर्धच तोडलेलं मामीना कळलं पण बोलल्या नाहीत कांहीच..

त्यांना आठवलं;

‘एकदोनवेळा दुसरी पाळी करून परतलेल्या दादूसाठी आपण दार उघडलं तेव्हां अंधा-या बोळात कसलीशी खसफस ऐकली होती. गोखल्यांच्या जिन्यावर पावलं वाजलेलीही ऐकली त्यांनी. दादू आत आला तो अंधारातच कपडे बदलून कॉटवर आडवा झाला; बाथरूमलासुद्धा न जाता...”

मामींची तंद्री लागली तरी ताराबाई मात्र गप्पा मारत निवडलेल्या भाजीची डेखं बाथरूमच्या बाजूच्या डब्यात टाकायला गेल्या. आधी त्यांचं वरती लक्ष गेलं. अंगात कांहीच नसलेला जयंता खिडकीशी ओठंगून उभा होता. खालच्या झडपा लावलेल्या असल्या तरी फटीतनं त्यांना दिसलं ते विचित्र होतं. जयंता पूर्ण नागवा होता! समोर बघत. त्यांनी वळून गोखल्यांच्या खिडकीत पाह्यलं. दिसलं कोणीच नाही. पण त्यांची खात्री पटली कि सुमी त्यांची चाहूल ऐकून पटकन् बाजूला झाली.

त्यांनाच शरमल्यासारखं झालं. मुलं झाली तरी तशी मोठीच होती दोघंही. त्यांच्यासमोरच तर लहानाची मोठी झालेली.

थोडया वेळाने मग खालच्या खिडकीच्या गजांजवळ जात मालकिणबाई ना त्यांनी संयमित शब्दात जाणीव दिली असावी..

‘जयूच्या आई, जयू कपडे फाडतो कि काय आताशे?’

त्यांना बहुतेक फेडतो म्हणायचं होतं; पण जीभ रेटत नव्हती. मालकिणबाई आधीच अस्वस्थ, त्यात’हे आणि काय आता’ असा भाव त्यांच्या चेह-यावर!

‘नाही.. म्हणजे तुमचं लक्ष असतंच पण म्हटलं सांगावं.. चौकातनं लोकं जातयेत असतात. बघणा-याला विचित्र वाटायला नको. म्हणून आपण आपलं जपावं.’

शेवटचं वाक्य त्या गोखल्यांच्या खिडकीकडे बघून म्हणाल्या असाव्यात!

मालकिणबाई समजायचं ते समजल्या. ताराबाईंची पाठ फिरल्यावर त्या जिन्याकडे वळल्या. जयंताला कपडे घालायला लावण्याचं गलिच्छ काम करावं लागणार ह्या अस्वस्थ विचाराने!

आणि एक विचार त्याच क्षणी त्यांच्या मनात चमकून गेला.

'माणसं जर इतक्या निर्लज्जपणे वागतच असतील तर मग.... आपण हे सगळं करत बसण्यापेक्षा..

गोखलीणबाईंशी एकदा बोलून बघायला काय हरकत आहे? पत्रीशी उलटली त्या पोरीची. आता कसला आलाय् मंगळ नि बिंगळ... हा सततचा घोर तरी कमी होईल! आपण तरी किती काळ स्तोत्र नि अंगारे करत बसणार..'

पण.. पण मग कधीतरी रात्री आपल्या खिडकीच्या खालच्या गजातनं त्या अंधा-या बोळात जाणवलेली संशयास्पद हालचाल आठवली कि त्या अजूनच अस्वस्थ व्हायच्या!

त्यांच्यावर गोखलीण बाईंशी बोलण्याची वेळच आली नाही!

खालच्या बाथरूमात कपडे धुवायला आलेल्या सुमीची ओकाबोकी सगळयांच्याच लक्षात आली.

मामींनी कसलीच जाग न देता शांतारामाला गांवी पाठवून दिला; सुटी घेऊन. मग मात्र सांगायला लागल्या कि'त्याची बदली झाली'. तो मग कधीच कोणाला दिसला नाही. उलट पुरंदरे मामीच थकल्यावर गांवी गेल्या. पण ते खूप पुढे. वाडा पाडायच्या आधी पैसे घेऊन.

गोखलीणबाई एक दिवस स्वतःच ताराबाईंना घेऊन मालकीणबाईंकडे गेल्या...मनातल्या शंका व्यंकटेशावर सोपवून त्यांनी डॉक्टरांच्या कानावर घातलं नि झालं.. मालकांच्या घराला तोरणबिरण नाही; फक्त आंब्याचा टाळा लागला नि दोन्ही खिडक्या उघडून खालच्या बैठकीच्या हॉलमधे लग्न लागलं. विधवेचा पाट लावल्यागत.. फुलांच्या मुंडावळया नि काजळाचं गालबोट लावलेला जयंता स्वतःशीच हंसत होता नि शरमल्यागत वाटणारी; हिरवे चुडेचोळी ल्यालेली, पहिल्यांदाच अंगभर साडी नेसलेली आडव्या बांध्याची सुमी नवी नवरी न वाटता वरमायच वाटत होती! म्हंजे खिडकीच्या गजातूनच अक्षता टाकून पेढा खात परतणारी वाड्यातली लोकं तसं म्हणाली!

नथीचं सुंकलं घातलेल्या गोखलीणबाई कन्यादान करून घरी आल्या नि ठेवणीतलं लुगडं बदलून बाहेर पडल्या नि टोपी खुंटीला टांगून गोखलेही! हातात पेपर घेऊन डॉक्टरही दवाखान्यात!

जुईने दिलेली ब-यापैकी साडी नेसलेली'धाकटी' मात्र नव्या जोडप्याबरोबर जेवायला थांबली......

हा सगळा चित्रपट कांही क्षणात त्याच्या डोळयांसमोरून गेला; आताच सगळं घडल्यासारखा!

समोरच्या प्रेसच्या बोळाकडे वळलेली पावलं कांही क्षण थबकली. कारण त्याच त्या जुन्या दिंडीच्या जागी झालेल्या गेटातनं मुलाच्या हाताला धरून चाललेली'ती' दिसली! आडवेपणात भर पडलेली नि चंदेरी केसांची सुमी. वय आणि सुख (!) अंगावरून ओसंडून जात होतं. तरी एक जुनी गोष्ट तिच्याही चेह-यावर होतीच; मालकीणबाईंच्या चेह-यावरची चिंता! फक्त ती व्यंकटेश स्तोत्र म्हणातांना दिसत नव्हती एवढंच.

कारण दाढीमिशावाला बाप्या वाटावा असा मुलगा, दप्तर म्हणावं अशी पाठीला लावलेली बॅग संभाळत वर पाहून हात हलवत होता. त्याचं लक्ष

गेलं, वरच्या बाल्कनीतनं'तो' हात हलवीत होता. थोडा सुधारल्यागत वाटणारा जयंता!

सुस्कारा सोडून तो प्रेसच्या बोळाकडे वळला!...

* * * * *

मामीने कधीतरी सांगितलेल्या सगळया खाणाखुणा पटल्या! इतिहासाची पुनरावृत्ती..

पण बोळात शिरण्यासाठी पाऊल उचलण्याआधीच मागून त्याच गेटाच्या बाजूच्या फर्निचरच्या दुकानाजवळून हांक आली.. चक्क माझ्याच नांवाने. थरथरता असला तरी आवाज ओळखीचा वाटला...

'शांतारामा..'

चमकून मागे बघितलं.. ते डॉक्टर होते; व्हीलचेअरवर बसलेले! हाताने खुणा करून बोलवत होते. जावंच लागलं. कारण एकदा चमकून मागे बघितलं म्हणजे ओळख दिल्यासारखंच झालं ना.... जवळ गेलो.. त्याच थरथरत्या आवाजात म्हणाले..

'खरं आहे तू आत्ता बघितलंस ते.. हेच प्राक्तन होतं. आमचं नि त्या जुन्या वाडयाचं!

५२१ नारायणपेठ.. आणि दुसरा डॉक्टर लागणा-या डॉक्टर आठवलेंच्या वाडयाचंही!!

○○○○○

घाटाच्या पाय-या उतरतांना त्याचं लक्ष गेलं, समोर काळया करडया आभाळावर मंदशा लाल पिवळया किरणशलाका पसरायला लागल्या होत्या; त्यांचा प्रकाश फाकण्यापूर्वीच खाली उतरायला हवं. स्नान वगैरे... म्हणजे त्याच्या शहरी भाषेतली ती अंघोळ पांघोळ व्हायला हवी.

'उजाडतांना आपण आपल्या जागेवर असलेलं बरं. यात्रेकरूंची नि भिका-यांची गर्दी एकाच वेळी व्हायला लागते.'

म्हणजे असं तो शेजारी बसणारा ढकलगाडीवाला लंगडा सांगायचा. गुडघ्याखाली दोन्ही पाय गमावलेला तो चाकं लावलेल्या फळीवरनं स्वतःला ढकलत जायचा. तो स्वतः खाली जाऊन येईपर्यंत लंगडा त्याची जागा संभाळायचा. ही गेल्या कांही दिवसातली संवयच होऊन गेलेली.

धर्मशाळेच्या ओव-यातनं नवीन माणसं येतच रहायची नि जुनी सहज हद्दपार व्हायची भीति.

त्याला कुठे फार दिवस रहायचं होतं.. जुन्या संवयींची ठिकाणं पहायची. लागला तर शोध, नाहीतर यात्रा! उगाच एकाकी मनाची समजूत घालायसाठी.

'बाबूसा आप अपणी जग्या मत छोडो.. ये भारवाले आके हमको हटा देंगे..'

'हां भै. मै आउं तबतक आप बैठे रहो. फिर मै सम्हालूंगा.'

तो लंगडाच काय इथले सगळेच कधीतरी तो म्हणे तसे'भारवालेच' होते. गरजेनुसार आलेले, थोडे मागेपुढे आले असले तरी. मात्र प्रत्येकाची गरज नि पार्श्वभूमि वेगळी. सगळेच भिकारी नव्हते. कांही भटके, फिरस्तेही होते. त्याच्यासारखे! कोणी हंगाम बघून स्थलांतर करणारे. तशीही भीक मागावी लागतच नव्हती. कोणा ना कोणातरी भाविक यात्रेकरूचं अन्नदान असायचंच. ब-याचदा पितृतर्पण झाल्यावर! ते त्याला फारसं आवडायचं नाही.

पण बरेचजण गंगापूजन करणारेही असायचे. त्यात उत्तरेकडचेच अधिक. जातायेता प्रसाद वाटणारे.

ब-याचदा बुंदी नाहीतर शेवखंडासारखं कांहीतरी गोड.

संध्याकाळी आरतीच्या सोहळयाला हजेरी लावण्यापुरते येणारे यात्रेकरूही असायचे. कौतुकाने प्रवाहात द्रोणातले दिवे सोडणारे. गंगामाईला सगळे सारखेच!

परिस्थितीमुळे आलेला एकाकीपणा नि त्यातून आलेलं नैराश्य घालवण्यासाठी भटकंती हाच उपाय. निदान त्याच्यापुरता त्याने ठरवून घेतलेला. त्यातून मग सतत कसल्यातरी शोधात असल्यागत फिरणा-या त्याच्यासारख्या फिरस्त्याला असल्या ठिकाणचे हे सर्व व्यवहार माहित होते आणि त्याचा तिटकाराही वाटायचा. विशेषतः फुकट हात पुढे करणा-या ऐदी लोकांचा. ब-या परिस्थितीमुळे त्याला ते अवघड वाटायचं.

हे आठवतांना त्याला नवल वाटायचं कि....

‘कधीकाळी घर सोडून साधूंच्या मेळाव्यातनं फिरतांना आपणही हात पुढे केलाच असेल कि..

घर ही तशी चैनच. आपल्या वाटयाला फारशी आलीच नाही कधी. कारण ऐन चाळीशीत आजारी निराच्या जाण्यानंतर एकाकीपणा घालवायसाठी इकडेच उत्तरेत बदली करून घेतली; डेहराडूनला. तेव्हांच बारा वर्षांचा ओझं होऊन राह्यलेला पांगळा संसार संपला होता. तिच्यासारखंच अशक्त मूलही गेलंच होतं आणि आपण ज्यात मनाने कधीच गुंतलो नव्हतो तो संसार सोडायला फारसं जड गेलं नाही.

मात्र फारशी गुंतवणूक नसतांना तरूणपणी केव्हांतरी मामांच्या शेजारी भेटलेली गौरी मधूनच आठवायची पण ते तेवढंच. एरव्ही पाऊल वाकडं पडेल अशी शक्यता कमीच.

कशी कोण जाणे; वैवाहिक अनुभवानी उमेद खचल्यामुळे असेल कदाचित् पण शारिरीक ओढीपेक्षा आत्मिक ओढ प्रभावी ठरली. त्यामुळे इकडच्या

ब-याच धर्मक्षेत्रातून त्यावेळी अशीच निरूद्देश्य भटकंती झाली होती. इकडच्या ब-याचशा चालीरिती आणि लोकांच्या संवयी अंगवळणी पडल्या होत्या.

नंतरही रतलामला बदली झाल्यावरची कांही वर्ष अशीच भटकंतीत गेली; पण वेगळया प्रांतात; वेगळया वातावरणात. तिथून भटकतांना नर्मदेच्या सान्निध्यात स्थिरावण्यासारखी परिस्थिती निर्माण झाली होती. पण.. पण.. पुन्हा तीच वणवण नशीबी होती बहुतेक!

तरीही आता का परत इकडेच यावंसं वाटलं? पुन्हा स्थिरावण्यासाठी? कदाचित्!

पावलं गारठलीत तरी आपण किती सावकाश पाय-या उतरतोय? अजूनही भोवतालाचा मोह सुटत

नाही? नसावा. मनातली सुप्त आशा नि नजरेतली शोधकता तशीच राह्यलीय!'......

खरं होतं ते. कारण क्षणभरासाठी त्याची पावलं थबकली होतीच... डाव्या अंगाने एक ओळखीची, पूर्वी पाह्यल्यासारखी वाटणारी मानवी आकृति पाय-या चढून वर येत होती. निदान चाल तरी ओळखीची वाटत होती. समोरून येणा-या अर्धवट उजेडाकडे पाठ करून पाय-या चढत होती. चेहरा राहोच, शरिराचा कुठलाच भाग दिसणार नाही अशी पांढ-या वेषातली श्वेतपुतळी! चेह-यावर ओढलेल्या पदरामुळे ती स्त्री आहे एवढंच कळत होतं. खांद्यावर बहुतेक ओल्या कपडयांचे पिळे नि हातात फक्त एक लोटा. पूर्णपणे कपडयात झाकलेला काटकीसारखा काटक देह, शरिरबांधा परिचयाचा. कांही क्षण त्याला वाटून गेलं,

'वरती, घाटाच्या वरच्या अंगाला स्त्रियांच्या स्नानाची वेगळी व्यवस्था असतांना ही इथे उघडयावर कशी? कि ही तिच्या संवयीची गोष्ट? नर्मदेवरची! म्हणजे ही तीच असली तर! आपला शोध इथेच संपणार का?'

....

ती शांतपणे पावलं टाकत डावीकडून वर गेली. तो मात्र खोटी आशा धरून पहात राह्यला, नि मग सकाळच्या गारव्यात उघडया पावलांनी होत नव्हतं तरी भराभर पाय-या उतरायचा प्रयत्न करायला लागला. खडावांशिवायच...

....

'त्या तर कधीच विसर्जित केल्या होत्या नर्मदेवरच, उमाच्या आठवणींबरोबरच. पण आठवणी पुसल्या नाहीतच. नाहीतर तिचा शोध घेत का फिरतोय आपण? आधी केली तशी निरूद्देश्य भटकंती नव्हेच ही.. बघूया पावलं नेतील तिकडे जायचं. आता पैसे संपत आलेत.. रतलामला उतरून गेल्या कांही महिन्यांची साठलेली पेन्शन घ्यायलाच हवी. कारण पुढच्या प्रवासात लागणारच ना. कुठे जायचंय नक्की नाही. कपडे नि पायताणं! इथे गांवात फिरतांना स्लिपर आहेतच कि. भटकंतीला ब-या. चोरीची भीति नाही.

तेव्हांची गोष्ट वेगळी होती. कसलेच पाश उरले नसल्यामुळे नोकरी नांवाला नि भटकंतीच जास्त. तीही साधूंच्या मेळाव्यात. म्हणून कफनी नाही तरी खडावा आल्याच. त्या भटकंतीमुळेच कि काय रतलामला बदली झाल्यावर पुन्हा एकदा आपण लांब रजा टाकून नर्मदा परिक्रमावाल्या गोसाव्यांच्या टोळीतून फिरत ओंकारेश्वराला संगमावर गेलो होतो. आणि..

तेव्हांच तर ती भेटली. उमा... जिच्या शोधात आपण गेले कित्येक महिने हिंडतो आहोत; नोकरीचा राजीनामा देऊन.

उमाभारती हे मठाधिपती महंत श्रीनिवास ह्यांनी तिला दिलेलं नांव. मूळ उर्मि म्हणजे बहुतेक उर्मिला असावी. राजस्थानी फिरस्त्यांमधली होती म्हणे. पण होती वेगळीच. लिहावाचायला येण्यापुरतं शिक्षण झालेली. आणि प्रथेप्रमाणे लवकर लग्न होऊन मग नव-याने टाकलेली!

अंगावर कोडाचे डाग दिसले म्हणून. दोन्ही घरच्यांनी अडाणीपणामुळे देवीचा कोप समजून उपाय न करता तिलाच अपाय केले. तेव्हां पळून जाण्याशिवाय गत्यंतरच नव्हतं.

कुणा असहाय्य वयस्क विधवा यात्रेकरूबरोबर सोबत म्हणून संगमावर पोहोचली नि महंतांच्या दृष्टिला पडल्यावर मठात आली. जातीमुळे असेल

कदाचित पण रसोईपासून ती लांबच राह्यली. स्वच्छता व इतर कामासाठी.''
......

खालच्या पायरीवरून पाण्यात पाऊल टाकतांना शिरशिरी आणणारा तो थंडगार स्पर्श सुखावून गेला. संवयीचा असल्यासारखं वाटलं त्याला आणि अचानकच असाच गारवा अनुभवलेल्या नर्मदेची आठवण आली. म्हणजे पुन्हा पर्यायाने उमाची.....

''खरं तर डेहराडूनला असतानाच कितीतरी वेळा इकडे गंगास्नान घडलेलं. पापक्षालनासाठी नव्हे. ते हेतूतः घडण्याची शक्यताच नव्हती. प्रपंचाचा गुंतवळा नव्हताच नि सुरवातीचे काही दिवस सोडले तर गुंतून पडण्यासारखी माणसंच भेटली नाहीत; एका गौरीशिवाय! तोही सहवास थोडा नि आठवणीच जास्त... पण उमाच्या आठवणी; फारशी जवळीक निर्माण न होताही! ही फक्त आंतरिक ओढ? तसंच असावं!

'मधुस्फिता वाचः परमम् अमृतम....'शिवमहिम्न!

महंत श्रीनिवास स्वतः म्हणायचे ते बहुदा तिने पाठ केलं असावं किंवा महंतानी शिकवलं असावं.

ह्या महंतांचं एक वैशिष्ठय म्हणजे ते स्वतः स्तोत्र म्हणत असले तरी बहुतेक आर्यसमाजी असावेत. धुनीशेजारी त्यांचं होमकुंड होतं. पण एरवी मठात कसलीच पूजामूर्ती नव्हती! ही उमा समोरच्या ओवरीपलिकडच्या एका वयस्कर बुआजींच्या खोलीतल्या तसबिरीपुढे बसून झांजा वाजवत एकटीच आरती म्हणायची नि रसोई संभाळणा-या बुआजी शेजारी बसून हलकेच टाळया वाजवायच्या.

कसली आरती हे तिच्या उच्चारांमुळे कळलं नाही तरी आवाजात गोडवा होता नि आर्तताही!

तिचा तो गाभा-यात घुमावा तसा गंभीर आवाज दुरून आल्यासारखा! धुनी पेटवलेल्या चौकापलिकडून यायचा.

स्तोत्र म्हणतानाही तसेच स्वच्छ उच्चार. शुभ्र पदराच्या महिरपीतला सावळा पण तजेलदार चेहरा. वाटायचं, धुनीजवळच्या होमकुंडा समोर बसून आहुति देतांना महंतांच्या चेह-यावर जे तपश्चर्येचं तेज दिसायचं तेच तिच्याही चेह-यावर असावं.

पण ते शक्य नव्हतं. धुनिजवळ यायला स्त्रियांना बंदी होती!

कांही बाबतीत जुनाटपणा होताच; ह्या हरिद्वारच्या विधवाश्रमांसारखाच! त्यामुळे समोरासमोर भेट क्वचितच घडली असेल. तरीही ओढ वाटत राह्यलीच. तीच आंतरिक ओढ.

मठात स्त्रियांची चांगली व्यवस्था असतानाही भल्या पहाटे नर्मदास्नान करून घाटावरून निथळत येणारी उमा पाह्यल्यावर मनात चलबिचल झाली तरी ती तेवढयापुरतीच. एरवी वाटायची ती ओढ वेगळीच. फक्त सहवासाची नव्हे तर तिला ऐकण्याची, तिच्याशी बोलण्याची! बोलणं जवळजवळ नाहीच. पण सकाळचं स्तोत्रपठण नि संध्याकाळची आरती ह्यातला लोभस गोडवा कानांना सुखावे.

ते सर्व मागे सोडूनसुद्धा कित्येक महिने लोटले!

त्याआधीचे कांही दिवससुद्धा विचार करण्यात घालवलेले.. महंतानी असं का केलं असेल? एकटया उमाभारतीला म्हणजे उर्मिलेलाच एकटीला शिक्षा म्हणून मठातून हद्दपार केलं. म्हणतांना म्हणाले कि ती स्वतःच प्रायश्चित्त म्हणून गेली.

पण लोकांकडून ऐकलं होतं ते तिचं मानसिक स्खलन! आणि मग ही शिक्षा. हद्दपारीची! हे पटण्यासारखं नव्हतं. उमा व्यभिचाराच्या पातळीवर उतरणं शक्य नव्हतं. अर्धशिक्षित असूनही संस्कारी आणि संवेदनशील असलेली, मठातले सगळे नियम पाळणारी उमा, एक परित्यक्ता!

दोष फक्त तिच्या शारीरिक व्यंगाचा. म्हणजे अंगावर आलेल्या कोडाचा. तिचं पाऊल वाकडं पडण्याची शक्यताच नव्हती.

मग हे खरं होतं कि ती स्वतःच निघून गेली? तेही आपण रतलामला जाऊन येईपर्यंतच्या काळात. असं का हे विचारण्याची सोय नव्हती. तेवढी

हिम्मतही नव्हती. पण रतलामला नोकरीचा राजीनामा देऊन आल्याचं सांगितल्यावर महंतांची प्रतिक्रिया विचित्र वाटली, न पटणारी!

‘आओ जी आओ.. हमे लगा आप चले गए हमेशाके लिये!’

‘ऐसा क्यूं लगा आपको?’

‘दोनो साथ ही साथ गये थे ना!’

‘कौन दोनो? हम तो अपने कामका त्यागपत्र देने गये थे.. सोचा आपके चरणोमे बची हुई जिंदगी गुजार दूं.’

‘और उमाजी?’

‘कहां गई वो?’

‘आपही के पीछे!’

‘आपकी आज्ञा के बिना? यह नही हो सकता.’

‘आज्ञा तो आपनेभी नही ली!’

‘बताकेही गए थे. इसलिये कि हमे लौटना था! अब क्या किया जाए?’

‘क्या करें? हरकोई अपनी मर्जीसे जाता है. वो चले गई. चाहे तो आपभी जा सकते है! हमारे पाव तो कोई और दबा देगा!’

बोलणंच खुंटलं! सगळं जमून आल्यासारखंच वाटत होतं. खरं काय ते उमाच्या शोधानंतरच कळणार. मठातल्या इतरांकडून कळलं ते एवढंच कि -- --

‘उमाचं पाऊल घसरलं;तेही स्वतः महंतांच्या बाबतीत! म्हणून ती प्रायश्चित्त घ्यायला गेली.’

वस्तुस्थिती माहित नसली तरी खटकण्यासारखीच होती. महंत सुचवताहेत कि ती आपल्या मागे गेली नि लोकं म्हणताहेत कि ती घसरली नि प्रायश्चित्त घ्यायला गेली! इथेच गोम आहे.

मानसिक स्खलन! आणि प्रायश्चित्त म्हणून हद्दपारी हे पटण्यासारखं नव्हतं. म्हणूनच तिचा शोध घ्यायचाय. आपणच तिच्या सर्वनाशाला कारणीभूत नाही ना हे जाणून घ्यायसाठी! असो.

ह्या लंगड्याचं बरं आहे. बुडाला गाडी बांधूनच पाय-यावरनं उड्या मारत येतो.

स्वतःबद्दल फारसं सांगत नाही. पण बहुतेक कुटुंबाने नाकारलेलाच असेल. अशीच सगळी माणसं भोवताली आहेत. बायकांचं बरंय.. त्यांची वेगळी सोय आहे; विधवाश्रमात. कांही श्रीमंत विधवा म्हणे मोठाल्या घरातून रहातात; नोकर वगैरे ठेवून. तेही असेच घरच्यांनी टाकलेले नि समाजाने नाकारलेले! असं पूर्वी ऐकलेलं. म्हणजे त्यांच्याकडे काम करणा-यात ही भेटेल? त्याच अंदाजाने आलोत ना!''......

निथळत्या अंगाने पाण्याबाहेर येऊन कपडे बदलतांना त्याच्या लक्षात आलं कि लंगडा वर वाट बघत असेल. धर्मशाळेच्या ओवरीत. त्याला लवकर जाऊन सोडवायला हवा. नाहीतर...

इथे फक्त जागा संभाळायला लागायची. म्हणूनच आलटून पालटून जाऊन एकमेकांचं सामान संभाळायचं असा अलिखित करारच होता जणू.

होतं काय असं सामान! लंगड्याची ढकलगाडी त्याला न्यावीच लागे. घाटाच्या वरच्या अंगाला कुठल्याशा घुमटीबाहेरच्या भिंतीवर दोरी बांधून वाळत घातलेला राजस्थानी गमछा नि लुंगी. आतमधे कपड्याची थैली म्हणावी अशी रंगीत झूल लावलेली पिशवी. कदाचित थोडे पैसेही असावेत. भिकेतनं साठवलेले. कितीतरी आधीपासून आहे इथे.

शेजारी त्याची स्वतःची शबनम नि पाळणारा लेंगा. त्याच्या शबनममधे वर कोंबलेले कपडे नि तळाशी बाहेरून पुस्तकासारखी वाटणारी डायरी व तिच्या कव्हरमधे थोडयाफार नोटा. पण त्याचा एकूण अवतार बघून कोणाला तशी शंकासुद्धा यायची नाही. मात्र तो भीक मागणारा नव्हता. कोणी चुकून त्याच्या पुढयात टाकलंच एखादं नाणं तर ते लंगडयाचं असा अलिखित करारच असल्यासारखा.

लोणच्यांच्या दुकानाबाहेर बसून लंगडा, पानावर किंवा द्रोणात दिली जाणारी पुरीभाजी खायचा. तेव्हां तो फक्त चहा प्यायचा, लंगडयाच्या पैशांनी केव्हांतरी.

दारखिडकी नसलेल्या ओवरीच्या फरसबंद जमिनीवर दोघांच्याही चटई सारख्या विणलेल्या हात-या. अशाच कोणीतरी टाकलेल्या असं लंगडा म्हणायचा. पण त्याला संशय होता कि लंगडा खालच्या घाटावरच्या स्मशानभूमितनं कांही आणतो कि काय.

यात्रेकरूंच्या गर्दीच्या वेळी लंगडा ओवरीच्या खालच्या पायरीवर बसायचा; तीच हातरी पुढयात टाकून. तो मात्र कधी डायरी चाळायचा किंवा विचार करत बसायचा. कधी धोकटी घेऊन फिरणा-या न्हाव्यासमोर बसायचा. खाजणारी वाढलेली दाढी करायला. ब-याचदा बाहेर पडायचा; जुनाट घरांच्या गल्ल्यामधून वाट काढत फिरायला. शोधक नजरेने पहात...

गमछा पिळून आपल्या उघडया खांद्यावर टाकताना त्याने स्वतःशीच नकारार्थी मान हलवली.

........

'जाऊं दे. इथून हलायला हवंच केव्हांतरी. कदाचित लवकरच. तोवर कसेबसे दिवस ढकलायचे. आपला शोध पूरा होईपर्यंत. तो होईल? शंका आहे!

पैसेही आता संपत आले असतील. यात्रेकरू देत असतात पण आपण हात पुढे करायचा नाही. टाकलंच कोणी एखादं नाणं तर लंगडा होताच उचलायला. बिचारा चहा पाजतो केव्हांतरी. आपण जेवतखात नाही हा त्याचा समज तसाच राह्यला हवा. बाजारातनं फिरतांना कचोरी नाहीतर पराठा खातो हे त्याला समजता नये. नाहीतर तो चटईवरच्या भीकेशिवाय अजून हात पुढे करील.

त्याने जुनी शाल अंगावरून ओढून काढून घेतलीच होती;कोणीतरी दयेपोटी टाकलेली. विटलेली असूनही रंग ओळखीचा वाटला; कुठेतरी पाह्यल्यासारखा! त्या जुनाट चादरीत देह पूर्ण झाकला जात नव्हताच. ते बघूनच त्या कोणी पांथस्थाने शाल टाकली असावी; पहाटेच्या अंधारात. खाली घाटावर अंघोळीला जाताना. नक्की कोणाच्या अंगावर होती ते न कळल्यामुळे लंगड्याने सोयीस्करपणे ती घेतली नि आपणही ती सोडून दिली. कोणास ठाऊक, कोणी प्रेतावरची सुद्धा आणली असेल. कसलातरी वासही येत होताच.

हा लंगडा आपली थैली उघडून बघण्याचा आगाऊपणा करणार नाही ना? पैशांसाठी. ते तर आपणच त्याला देतो आहोत. राहिली फक्त कसल्या कसल्या किरकोळ नोंदी केलेली जुनी डायरी! काय करणार तो ती घेऊन? तो तर अक्षरशत्रू.. म्हणजे डायरी वाचण्याएवढं कळत असेल असं नाही वाटत...''......

दिशा उजळायच्या आत लंगड्याला खाली सोडायला पाह्यजे म्हणून तो भराभर पाय-या चढायला लागला. ओल्या पावलांनी घसरण्याची शक्यता असूनही. अजून एक कारण होतंच त्याच्या लगबगी मागे. मघाशी दिसलेली ओळखीची आकृति वर जाऊन उजवीकडे वळली होती.......

'' कुठे गेली असेल ती? प्रवाहाला समांतर खालच्या अंगाला गेलेल्या, धक्कयाच्या आश्रयाने उभ्या असलेल्या छोटया शिवमंदिराला वळसा घालून मागच्या गल्लीतून गेली असावी. कारण देवळाच्या घंटेचा आवाज ऐकला होता. ती तिची जुनी संवय. ओंकारेश्र्वराच्या संगमावरची! ओलेत्याने हातातल्या लोटयातलं पाणी पिंडीवर घालायची. म्हणजे ही तिकडेच गेली असावी, स्मशानभूमिच्या वरच्या अंगाला. तिकडे वस्ती असली तरी स्थानिक बहुजनांची म्हणजे सफाई वगैरे किंवा स्मशानकार्य करणा-यांची. तिकडच्या डोंगरी उतारावर एखादा आश्रम वगैरे असण्याची शक्यता कमीच. शोध घ्यायला हवा.

आज लंगडा येऊन बसला कि किटलीवाल्या पोराचा चहा नाही घ्यायचा. चहाच्या निमित्ताने सरळ बाहेर पडायचं. आणि वाढलेल्या दाढीचं निमित्त होतंच. बघूया कांही शोध लागतोय का.''

......

तो आपल्या जागेवर येतोय तो लंगडा तिथे घुसलेल्या गाईला घालवत होता. दिशा उजळल्या कि मोकाट गायी मिळेल तिथे घुसतात; अन्नाच्या आशेने. हे नेहमीचंच.

वैतागल्यागत लंगडा बोलला,

'बाबूसा, आप देरसे आव्या? ये माताजी म्हारेसे हटती नही थी. अब म्हारेको बखत लागे तबतक संभाळणा..'

लंगड्याच्या सुरात तक्रार होती. त्याच्या उशीर करण्याबद्दल. पण तो मात्र का उशीर झाला नि वाटेत काय पाह्यलं ते बोलू शकत नव्हता!

....................

तिन्हीसांजा व्हायला आल्या तशी पुलावरून गर्दी अलिकडे यायला लागली. किना-यावरही यात्रेकरूंच्या रांगा वाढायला लागल्या. बहुतेक हातात द्रोणातले दिवे घेऊन. स्थानिकातले काहीजण उभे लामणदिवे नि कापूरआरती घेऊन आरतीसाठी हजर. मधूनच उठणारा'हर हर गंगे'चा घोष. सारं सारं अंग शहारून टाकणारं. त्याने पूर्वीच अनुभवलेलं.

त्याला त्यात नाविन्य नव्हतं म्हणून तो वरच थाबून राह्यलेला; कोणाच्या तरी प्रतिक्षेत असल्या सारखा! पहाटेची उत्सुकता तशीच. दिवसा स्मशानघाटाच्या वरच्या अंगाला स्थानिक लोकांच्या वस्तीमधे फेरी मारून कांहीच उपयोग झाला नाही.'ती' कुठे दिसलीच नाही. नाही म्हणायला स्मशानघाटाच्या वरच्या शिवमंदिरात एक ओळखीची खूण दिसली होती. एका कोप-यातल्या खुंटीवर मृदुंगाशेजारी अडकवलेली झांज! तिचीच असेल असं नव्हे पण मग एकच

कशी असी शंका त्याच्या मनात येऊन गेलीच.' आरतीचे आवाज तर सगळयांचेच एकत्र मिळून येतात!'

फार मोठं नसल्यामुळे असेल पण देवळात वेगळा गाभारा नव्हताच. आणि मोठा दरवाजा सताड उघडाच असावा. सभागृह म्हणावं असंही नव्हतं. सकाळची आन्हिकं उरकल्यावर भर दुपारी सावलीला आल्यासारख्या रिकाम्या जागेत चक्क गाई रवंथ करत बसलेल्या. हे त्याला विचित्र तरी ओळखीचं वाटलं होतं.....

''म्हणजे तिथे नक्कीच स्मशानकार्य होत असावीत. म्हणजे स्त्रियांना मज्जाव. मग'ती' तिथे येत असेल? असेलही. संध्याकाळच्या वेळी घाटापासून पुलापर्यंत जो तो इकडे गंगाजीच्या आरतीच्या कौतुकात मग्न. स्थानिक लोकं यात्रेकरूंकडून पैसे काढण्याच्या विचारात. येतो कोण असल्या एकाकी देवळात.''

स्वतःशीच पुटपुटत वर जाऊन मग तो त्या देवळाबाहेरच्या घाटाकडच्या उतारावर जाऊन बसला. तिकडे खालच्या अंगाला अर्धवट अंधारात धुमसणा-या चिता. ब-याचशा बेवारस नि शेवटच्या प्रवासासाठीच इथे येऊन राह्यलेल्यांच्या. त्यांना निरोप देऊन परतणारी माणसं.

तिकडे वरती मात्र सगळा उत्सवी उत्साह! तिकडची आरतीची शोभा लांबूनच छान!

घंटा वाजल्याचा आवाज झाला म्हणून त्याने मागे वळून पाय-यांकडे बघितलं. अर्धवट उजेडात फक्त सावली दिसली. म्हणजे कोणीतरी नक्कीच आत गेलं असावंसं वाटलं. त्याला आतून कांहीतरी संवेदना जाणवली तसा तो उठला नि देवळाच्या पाय-यांवरून बघायला लागला.

तीच पहाटे दिसलेली सडपातळ आकृति. स्त्रीचीच. तशीच शुभ्रवस्त्रांकित.

चाहूल लागल्यामुळे ती वळली पण चेहरा झाकलेलाच. शिवलिंगाला अर्धी प्रदक्षिणा घालून कोप-यात गेली. तीच खुंटीवरची झांज घ्यायला. मिनिटभर देवापुढे उभं राहून पुटपुटल्यासारखी आरती म्हणून झाली नि मग सुरू झालं शिवमहिम्न... आवाज ओळखीचा पण गोडवा कमी झालेला! परिस्थितीमुळे असेल.

'मधुस्फिता वाचः परमम् अमृतम्....'

त्याची खात्रीच झाली. ती नक्कीच उमा होती. त्याचा अंदाज खरा ठरला, म्हणजे आता शोध संपला म्हणायचा? कसं कळणार?

ती तर इथे रूळलेली वाटतेय. सहा महिन्यांहून अधिक काळ लोटला तिने मठ सोडल्याला.

राजीनामा देऊन परतल्यावर तिने मठ सोडल्याचं कळलं; म्हणजे फक्त महंतांनी तसं सांगितलं.

इतरांकडून कळलं ते वेगळं होतं. तिला जायला सांगण्यात आल्याचं!

पाय-यावर पाऊल टाकणार तोच स्वतःभोवती प्रदक्षिणा घालण्यासाठी ती वळली. चेहरा झाकलेलाच. तो स्तंभित होऊन जागीच उभा, तिचं लक्ष जाईल ह्या अपेक्षेने. झांज परत खुटीला ठेवून; त्याला न बघितल्यासारखं करून ती शांतपणे पाय-या उतरायला लागली. चेहरा झाकलेलाच.

'ही नक्की तीच आहे ना? गोडवा कमी वाटला तरी आवाज तर तसाच. मग?'

ती वळण्याआधीच त्याने मागून आवाज दिला.

'उमाजी!'

क्षणभर पाऊल थबकल्यासारखं वाटलं. न वळताच ती म्हणाली,

'बाबूसा, आपको यहां नही आना चाहिये था!'

'मतलब आपने मुझे पहचाना?'

'छह आठ महिनोंमें कोई पहचान कैसे भूल पाएगा?'

'सुबह मैने आपको देखा था.'

घुंघट तसाच ठेवून ती सावकाश वळली नि म्हणाली;

'मै तो कई दिनोसें आपको देख रही हूं. पता था आप मुझे खोजते होंगें.'

'आश्रमसे निकलनेसे पहले अगर हमारी मुलाकात हो जाती...'

'उतना समय नही था मेरे पास.. निकलना तो थाही!'

'ऐसे अचानक? इतनी जलदी क्या थी?'

'जलदी थी. आपने कुछ कहानियां तो सुनी होगी ना. हमारे बारेमे...'

'हां. हमारे नामसे लेकर..'

'हां. पर सच्चाई कुछ और है जो कोई नही जानता!'

पायरी उतरतांना अर्धवट अंधारात पावलं अडखळली... दोघांचीही! नि मग आपोआपच अंधा-या रस्त्याकडे वळली.

'आप लौट जाईये बाबूसा. आप सुन नही सकेंगे.'

'और न सुनूं तो जा न सकूंगा!'

.... शेजारून घाटाकडे जाणा-या लोकांकडे दुर्लक्ष करून चेहरा झाकलेल्या तिच्याबरोबर चालताना त्याला समजली ती हकिगत सुन्न करणारी वाटली.....

महंत श्रीनिवास ह्यांचे पाय चेपून देण्याचं काम तो रोज रात्री करत असे. रतलामला जाऊन येण्याआधी त्याने परवानगी विचारली नव्हती. धूनीच्या चौकापलिकडे बुवाजीच्या खोलीत उमा झोपत असे. महंतानी हलक्या आवाजात तिला हाक दिली.

'देखोजी उमाजी... तुम्हारे बाबूसा तो बोलके ना गये. अब उनका काम तुम करोगी.'

ती चमकली. एकतर 'तुम्हारे बाबूसा' हा उल्लेख तिला खटकला. शिवाय नेहमीची 'बेटी' ही हाक न मारता एकदम 'उमाजी'? स्त्रिया नेहमीच सजग असतात. विशेषतः अनाथ स्त्रिया. ती सावधपणे जाऊन पुरूषांच्या ओवरीला खाटेवर लवंडलेल्या महंताचे पाय दाबून देऊ लागली. चूपचाप.. पण तिला अंदाज आला होता. कफनी काढून उघडया अंगाने झोपलेल्या महंतानी तोंडाने 'और उप्पर, और उप्पर' म्हणत हळूहळू लुंगी वर सरकवायला सुरवात केली तशी जमिनीवर बसलेली ती न बोलता ताडकन उठून गेली. महंताना कांही बोलणंच शक्य नव्हतं.

ते फक्त बघत राह्यले.

रोजच्या शिरस्त्याप्रमाणे पहाटे उठून ती नर्मदा स्नान करून घाटाच्या पाय-या चढत असतांना मुद्दाम आल्यासारखे महंत तिला सामोरे आले. तिने संवयीने ओला घूंघट ओढला.

'तुमने अच्छा नही किया. मेरी सेवा करनेका मौका गंवाया. तुम्हे यहां रहना मुश्किल कर दूंगा.'

'मै चली जाऊंगी.'

बस्स. एवढेच शब्द ती बोलू शकली.

'तोभी बदनाम तो होही जाओगी. मै सबसे कह दूंगा तुम बाबूसाके पीछे भाग गई. या फिर कहूंगा कि तुमने मर्यादाका भंग किया.'

उत्तर न देताच ती परतली.

लगबगीने आपल्या खोलीत जाऊन तिने कपडे बदलले नि बुआजी जागी व्हायच्या आत मागच्या रसोईच्या चौकाबाहेरच्या गल्लीतून बाहेर पडून तिने स्टॅन्ड गाठला, नेसत्या कपडयांवर. हातात फक्त एक पिशवी घेऊन मिळेल त्या पहिल्या बसने तिने गाव सोडलं. तिने एक गोष्ट पक्की ध्यानात ठेवली कि तिथे राहून बदनामीला सामोरं जाण्यापेक्षा दुसरीकडे भीक मागणं परवडलं! स्वतःचे असे पैसे नव्हतेच फारसे, पण अंगात बळ होतं; परिस्थितीशी झुंजण्याचं! मजल दरमजल करत इथे येऊन पडली; अशीच कोणाच्या तरी मदतीवर. कामही मिळालं नि एक महत्वाचा फायदा म्हणजे रोज गंगास्नान..

आयुष्य उध्वस्त करणारं कोड वाढत गेल्यामुळे कोणी ओळखणार नव्हतंच. इथेच देहविसर्जन करण्याची शेवटची इच्छा हेही कारण होतंच....

ऐकून सुन्न झालेल्या त्याच्या तोंडून नकळतच एक सुस्कारा निघाला!

'मेरी जुबानपर कौन भरोसा करता? बदनामीसे बचनेके लिये निकल पडी. दुसरी बार. पहली बार घरसे बेघर हो गई थी; अपनेही जेठकी बूरी नजर के खातिर. मेरा कोड तो उनके लिये बहाना था अपनी हवस को छुपानेका.. और इसी कुदरती देनने मेरा साथ दिया. अच्छा हुवा; इस बहाने मै किसीको मुह नही दिखाती. फिरभी...'

'फिरभी क्या?'

'आपने मुझे पहचाना और.. पता नही कोई औरभी....'

रस्त्यातल्या अर्धवट उजेडात सरकलेल्या पदराआडून त्याला थोडासा चेहरा दिसला. पांढराफटक झालेला!

'कौन है और?'

'कोई नही! जाने दिजीये.. मेरी कहानी तो आपने सुनी. आपको लगता है कि मै फिसल गई?'

'अगर लगता तो मै यहां क्यू आता तुम्हे खोजते; फिरसे साथ होनेके लिये!'

'वही मुष्किल है. यहीं मेरा आंखरी मकाम है. आप लौट जाईये. इसीमे हमारी भलाई है.'

'जाऊं भी तो कहां? कोई नही है मेरा!'

'सोचिये.. होगा कोई. कहीं तो आपकी प्रतिक्षा करता होगा.'

'पता नही. अब करनेके लिये सिर्फ एकही चिज बची है मेरेलिये.. विसर्जन! इस शरिरका. तुम्हे तो गंगाजी समा लेगी़ पर मुझे कौन और कहां बहा देगा?'

'ऐसा न कहिये. कोई तो आही जाएगा. पर हो सके तबतक अपनी सेहतका खयाल रखना.

और वह शालभी लेते जाईयेगा.'

'शाल?'

'हां. मैने आपको देखा था.. बदन सिकूडकर सोए थे.. मैने ओढ दी.'

'पहचानीसी लगती थी. तभी समझा था कि मेरी खोज पूरी हो गयी. लेकिन अब वह दुसरेकी हो गयी.'

'कौन?'

'वही शाल. अंधेरेमे पता नही दूसरेपर जा गिरी होगी. शायद उसे जरूरत होगी, मुझसे जादा!' चालताना ती अचानक थांबली.

'अब मुझे लौटना होगा. आरती खतम हुई होगी. यह आ गई मेरी मंझिल.'

'यहां किसके साथ रहती हो?'

'दो दो विधवाओंके बीच एक आधी सुहागन जिसका सिंदूरसे वास्ताही न हो.' एक निश्वास!

'आप यहींसे लौट जाईये. सेहतका खयाल रखियेगा.'

घुंघट पुढे ओढून ती अंधारात दिसेनाशी झाली...

बधीर पावलं उचलून तो मागे वळला. घाटावरचा माहौल आता शांत झाला असेल म्हणून.

उमाची भेट तर झाली पण कळलं ते फारच अविश्वसनीय वाटलं. महंतांच्याच नव्हे तर एकूणच निवृत्तिच्या, त्याग आणि सन्यस्त वृत्तीच्या भगव्या बुरख्याआड दडलेल्या वासनाग्रस्त जमातीच्या ढोंगीपणाची किळस वाटली.

स्वतःच्याच तंद्रीत आणि मानसिक गोंधळात मान हलवत तो विचार करत राह्यला.....

''शोध तर पूर्ण झाला. पण असा? ओढ होतीच पण सहवास? बहुदा स्त्रीसहवास आपल्याला लाभत नसावा. नियती! विनातक्रार स्वीकारलेली!''

बाजार रस्त्याने घाटावर जाऊन तो आपल्या कडीकुलूप नसलेल्या एका झोळीत सामावलेल्या संसारात परतला. लंगडा बसलेलाच होता; खालच्या पाय-यांवर. राखणदारासारखा! बहुदा रागावल्यासारखा दिसत होता, खाली घाटावरच्या गर्दीत हात पसरण्याची संधी हुकली म्हणून.

म्हणजे असं त्याला वाटलं. आता कसला रागलोभ. आता निराश मनाने निघणं भाग होतं. शोध संपला नि करायला कांहीच उरलं नाही. एकदम पोकळी निर्माण झाल्यासारखं वाटलं त्याला.

फक्त आपल्यावरचा डाग पुसल्याचं समाधान होतं सोबतीला. बस्स्!..

'आता रस्ता दिसेल तिथे जायचं. जगण्यापुरते पैसे मिळतीलच. पण जगायचं तरी कोणासाठी?

अचानक डोक्यात विचार चमकून गेला. उमा म्हणाली तसं वाट बघणारं कोणी असण्याची शक्यता नाहीच. तरीही फिरायचंच आहे तर... गौरीकडे जावं का? आता मामा असतील का माहित नाही. बघावं जाऊन. पक्का होत नव्हता तरी विचार सुरू तर झालाच.'..

‘आ गये बाबूसा? आपका थैला कोई ले जाता इसलिये हम रूक गये. लेकिन घाटपर तो आप थे नही!’

‘हां. शिवजीके दर्शन करने गया था. शमशानके उप्परकी ओर..’

‘सिर्फ शिवजीके? और कोई..’ लंगड्याने वाक्य अर्धवट सोडलं. तो क्षणभर चमकला.

‘मतलब कोई और देवताएं नही थी?’

लंगडा आपली उलटतपासणी घेतोय असं उगाच त्याला वाटून गेलं.

‘त्याला कांही संशय असावा का? असो असला तर. आपली ओळख ती कितीशी? सारा महिन्याभराचा परिचय. तोही परस्परांच्या गरजेतून निर्माण झालेला.’

हे फक्त मनातच. उघडपणे मग गरज नसतांनाही सफाई द्यायला लागला.

‘अब बस हो गये देवताओंके दर्शन.’

‘क्यूं? देवता भी नाराज हो गये शायद.’

‘ऐसी बात नही. पर एक जगह जादा देर नही रूक सकते.’

‘तो क्या खिसकनेका इरादा है? अच्छा खासा चल रहा है तो..’

आपली थैली पुढयात घेऊन तो बसता बसता कुठेतरी अधांतरी बघत राह्यला नि मग म्हणाला,

‘मंझिल तो कोई है नही.. बस्. जो मिल जाए वह अपना रास्ता! कल ही निकल जाउंगा.’

‘किस्मतवाले हो कि पैर मजबूत है. हमारे नसीबमे यहीं घसीटकर मरना लिखा है शायद. पुराने पापोंका प्रायश्चित करते...’

‘क्या पाप और क्या पुण्य! भाग्यका लिखा सामने आ ही जाता है.’

‘लेकिन मेरा भाग्य मैनेही बिगाडा है. उसे बेघर करके छोडा दर दर भटकने के लिये.’

‘किसे छोडा?’

‘अपनी घरवालीको. कोडके दाग आए तो घरसे निकाल भेजा; बडे भाईसा ने. उनके इरादे नेक नही थे शायद.’

तो चमकून बघत राह्यला. लंगड्याची कथा पुढे सुरूच राह्यली..

‘जबरदस्ती फटफटीया ले ली थी दहेजमे. उसके जानेके बाद भाईसा वहभी हमसे छिनना चाहते थे. मना करनेपर हमे उसीपर हाथ बांधकर शुरू करके रास्तेपर छोडा मरने के लिये. उन्हे तो दोनो नही मिले लेकिन हमे यह मिला और इस हालतने हमें यहां लाकर छोडा भीख मांगने के लिये. कोई अपनी मर्जीसे भिखारी नही बनता!’

त्याच्यासाठी हा दुसरा धक्का होता! नात्यांवरचा नि आयुष्यावरचा विश्वासच उडून जावा असा जबरदस्त धक्का.. व्यक्तिगत आयुष्यातले धक्के पचवले होते पण हे? त्याला विचित्र योगायोगाचंही आश्चर्य वाटलं. झटक्यात उठून तो बाहेर वाळलेले कपडे घेऊन आला नि शबनम मधे भरायला लागला..

‘इतनी रातको कहां जाओगे बाबूसा? सुबह चले जाना.’

‘नही. अब नही. आरतीवाले यात्री निकल रहे होंगे. पूलके उसपार यात्रीयोंकी बसें छूटती होंगी.’

तो धर्मशाळेच्या पाय-या उतरणार तो लंगडा त्याला अडवून अंगावरची शाल पुढे करत म्हणाला,

‘जरा रूकिये. इसे भी साथ लेते जाईये. काम आएगी. वैसेभी किसीने आपपरही ओढ रखी थी. आपही की थी शायद.’

‘रख लो आप. जरूरत पडेगी.’

‘नही. छिनी हुई कोई चीज नही रह पाती. ले जाईये और जाते जाते गंगाजीसे दुआ मांगिये कि हम उन्हीमे बह जाए!’

क्षणभर सुन्न झाला. मनात आलं, नियतीने का एक संसार असा उध्वस्त केला असेल? तो कांही बोलूच शकला नाही. फक्त लंगडयाच्या डोक्यावर थोपटल्यासारखं करून तो पाय-या उतरला नि क्षणभर घाटावरून परतणा-या गर्दी कडे आणि त्यांचं श्रद्धास्थान असलेल्या गंगेच्या प्रवाहाकडे पहात राह्यला.

‘आता पुढचा मुक्काम? कोणास ठाऊक! उमा म्हणाली तसं वाट बघणारं कोणीतरी असेल?

असंच, ह्या दोघांसारखंच आपलं विसर्जन करायला? नियतीने ठरवलंच असेल कांहीतरी. कोण करील आपलं और्ध्वदेहिक? कुठे विसर्जित होईल आपलं अस्तित्व?’

अचानक गौरीचा विचार आला नि त्याने पाऊल उचललं.

*****

ॐ

.. सोहळा..

'हॅलो.'

'हॅलो. येस..'

'हॅलो. नमस्कार. मला सरांशी बोलायचं होतं.'

'ते ओळखतात आपल्याला? आपलं नांव?'

'मी प्रमोद वाघ. सॉरी टू बॉदर. पण मला सरांशी बोलायचं होतं. विश्वनाथ भट. ते रजेवर असल्याचं कळलं. म्हणून..'

'हो खरंय. ते आराम करताहेत. आणि त्यांना फार बोलायचं नाही. त्यामुळे तुम्ही त्यांना नंतर...'

'हो. लक्षात आलं. म्हणूनच सेलफोन बंद असावा.'

'सेलफोन मीच काढून ठेवलाय.. नाहीतर बोलत बसतील उगाच.'

'क्वाईट टू. ॲम सॉरी. पण कांही प्रॉब्लेम आहे का ?.'

'हो. त्यांची ॲन्जोप्लास्टी झालीय आलिकडेच. त्याना सक्तीची विश्रांति घ्यायचीय कांही दिवस तरी..'

'ओह्. आय ॲम् सॉरी अगेन... मला हे माहित नव्हतं.'

'तुम्हाला ऑफिसच्या कामाबद्दल बोलायचं असेल तर ऑफिसमधेच फोन करा नाडकर्णींना. सध्या तेच बघताहेत सगळं. ते विशूला ब्रीफ करतील नंतर..'

'ओके मॅम. मी म्हणजे.. आमची कंपनी त्यांची क्लायंट आहे. सुप्रीम अप्लायन्सेस. मी भेटतो नाडकर्णींना. सरांना नंतर भेटेन. थॅंक्स.'

'ओ. के. मी तसं कळवीन त्यांना.'

'बाय द वे, मे आय नो हूम आय ॲम स्पीकिंग टू. आपण...'

'नंदिनी. नंदिनी ठाकूर. हिज फ्रेन्ड..'

एवढयात सरांनी आवाज दिलेला त्याला ऐकू आला.

'नंदू डिअर,  हूज कॉल इज इट?.'

'तुझ्या क्लायंटचा. तू घेऊ नकोस. मी बोलले इकडून. पडून रहा तू.'..

फोन कट झाला तरी शेवटचं संभाषण ऐकून प्रमोद गडबडला. बाई व्यवस्थित बोलतेय् आडनांव ठाकूर सांगतेय्, आणि फ्रेण्ड म्हणतेय्! सर डायव्होर्सी असल्याचं ऐकून माहित होतं. कायतरी झोल आहे. कांही उलगडा होत नव्हता. जाऊदे. काय करायचंय् कुणाच्या खासगी आयुष्याबद्दल जाणून. पण आवाज ओळखीचा वाटला. खूप पूर्वी केव्हांतरी ऐकल्यासारखा...

नाडकर्णींना भेटून प्रमोदने आपल्या मार्केटिंग मॅनेजरशी एक मीटिंग ॲरेंज केली. नवीन प्रॉडक्ट लॉन्च करायचं होतं. त्याची कन्सेप्ट ब्रीफ करण्यासाठी. शेवटी तो ज्युनिअर होता. पण विशूला जाता येणार नव्हतंच.

सध्यातरी सक्तीची विश्रांतीच चालू होती. रिकामपणी जुन्या आठवणी चाळवत बसण्यासाठीच बहुतेक...

नंदिनी ऑफिसमधे होती तेव्हां ती केव्हांही मदतीला हजर असायची, कुठल्याही फिल्डमधे मदत करायला. इन्टरडिपार्टमेन्ट कोऑर्डिनेशन चांगलं होतं. त्यामुळे तिच्यावरच अवलंबून रहायची संवय लागली होती....

'विशू डिअर.. मेफेअरच्या पब्लिसिटी एक्झिक्युटिव्हचा कॉल होता. मी घेतला. तू दुस-या क्लायंटबरोबर मीटिंगमधे होतास तेव्हां.'

'काय म्हणत होता?'

'रिमाइन्डर! त्यांच्याकडच्या प्रेझेन्टेशनची डेडलाईन जवळ आलीय. अजून डिझाईन आलेली नाहीयेत..'

'असं कसं झालं? आपला आर्टिस्ट काय म्हणतोय?'

'तो काय म्हणणार.. तो बोलूनचालून फ्रिलान्सर.. जॉब आऊटसोर्स केला कि हे टेन्शन आलंच..'

'त्याला इलाज नाही..'

'आहे. इलाज आहे.. आपण स्किल्ड माणसं हायर करायची..'

'पण त्यांना फुलफ्लेज काम नसलं तर? लाएबिलिटी वाढेल. कॉस्ट कशी कव्हर होणार..'

'क्लायन्टला हाय कोट करायचं.'

'आणि बिझनेस घालवायचा? बाहेर केवढी कॉम्पिटिशन आहे. तू त्या आर्टिस्टलाच रिमाइन्ड कर त्यापेक्षा...'

'ओ. के..' ....

दिवस जात राह्यले नि कामं होत राह्यली. पडल्यापडल्या विशू असंच सारं आठवत राह्यला.

नंदिनीचा ऑफिसमधला वावर हा आता इतिहास झाला होता. नंदिनीचं आजारपण उद्भवलं नि सारे संदर्भच बदलले. तिला नोकरी सोडावी लागली. तशी तर संसार मांडण्यासाठी ती नोकरी सोडणारच होती. ती तिची पूर्व अट होती.

आजारपणामुळे तिला वर्किंग विमेन हॉस्टेल सोडून विशूने आपल्या जुन्या फ्लॅटवर आणलं तेव्हां तर ती त्याच्या खांद्यावर मान ठेवून ओक्साबोक्शी रडली होती. ज्या घरात तिने थाटामाटात प्रवेश करायचा तिथे तिला असं गपचूप यावं लागलं.

इलाज चालू होते. कलकत्त्याहून तिची माँ आली नि विशूला तात्पुरतं रेन्टेड फ्लॅटमधे शिफ्ट व्हावं लागलं. त्यामुळे रोजचा कॉन्टॅक्ट कमी झाला. शिवाय विशूला डबल टेन्शन आलं.

तिच्या प्रकृतिचं नि कामाचंही..

....

विश्वनाथ भट हा एका ॲड एजन्सीचा सर्वेसर्वा. विशू भट म्हणून ओळखला जाणारा.

सुप्रीम अप्लायन्सेस ही एक नामांकित कंपनी. इलेक्ट्रॉनिक अप्लायन्सेस बनवणारी. विशूची मोठी कॉर्पोरेट क्लायंट. तसं त्याचं क्लायन्टेल विस्तारलेलं होतं. वेगवेगळया क्षेत्रात. पण फोकस कन्झ्युमर प्रॉडक्ट्सवरच.

कॉर्पोरेट अकाउन्ट घेऊन जॉईन झालेले दोघं ज्युनिअर पार्टनर होते. ॲन्युअल रिपोर्टसारखे जॉब असायचे ते आऊटसोर्स करावे लागत. लेआऊट फक्त एजन्सीचा. त्यांच्यामुळे टर्नओव्हर वाढला तरी कामं कटकटीची नि वेळखाऊ. शिवाय त्यांची अरेरावी खपवून घ्यावी लागे.

विशूला तेच टेन्शन होत. त्यातूनच हे आजारपण उद्भवलं.

अशा वेळी नंदिनीचं असणंही किती दिलासा देऊन गेलं असतं. पण आता ते शक्य नव्हतं. शिवाय ती त्याची काळजी घेत होती आणि वेळोवेळी त्याला अपडेट करत होतीच कि. तेही स्वतःचं काम संभाळून.....

प्रिन्ट मिडियाचा प्रॉब्लेम नव्हता. पण इलेक्ट्रॉनिक मिडियासाठी क्लायंट्सना अपडेट करून सतत नवनवे प्रयोग करावे लागत. तेही त्यांच्या बजेटचं भान ठेवून. शिवाय प्राईमटाईमसाठी कॉम्पिटिशन होती. एखादी कमर्शिअल क्लायंटनी ॲप्रूव्ह केली तरी कांहीवेळा होल्ड करावी लागे. नवीन प्रॉडक्टस् लॉन्च करताना नेहमीच सतर्क रहावं लागायचं. क्लायंटची सेल्स फिगरवर नजर असायची.. फार कटकटी होत्या.

त्यातच नेमकेपणाने माणसं हायर करणं ही त्यातलीच एक डोकेदुखी होती. नंदिनी बरोबर असतांना ते काम सोपं होतं. तिचं एचआरडी कडे लक्ष असायचं...

क्रिएटिव्ह टीम आपली जबाबदारी संभाळायची. मॉडेल कोऑर्डिनेटर मदतीला होताच. पण केवळ त्यांच्यावरच अवलंबून चालत नसे. कारण ते सगळे ह्या फिल्डमधे तसे नवखेच. प्रॉमिनन्ट मॉडेल्सची कॉन्ट्रॅक्ट नि टांट्रम दोन्ही संभाळायची. नवीन लोकांच्या बाबतीत गैरप्रकार व्हायची धास्ती वाटायची. नंदिनी सगळं व्यवस्थित हाताळायची...

तिच्या ॲबसेन्समधे सगळंच तिरपागडं व्हायला लागलं. नको त्या गोष्टी कानांवर यायला लागल्या. रेप्युटेशन खराब करू शकतील अशा..

क्रिएटिव्ह टीमच्या चीफला मग बोलवावंच लागलं....

'विक्रम आय नीड यू अर्जन्टली..'त्याने इन्टरकॉमवर मेसेज ठेवला.. विक्रमला कळलं काय काम आहे ते.

एक शूट कॅन्सल झालं होतं!

'येस बॉस..'त्याने विशूला मस्का मारायचा प्रयत्न केला.

'आय नीड टू नो..'

'व्हॉट..'

'शूट कॅन्सल क्यूँ हुआ? रिशूट करना होगा तो.. अब एडिट कब होंगा. सब शेड्यूल डिस्टर्ब होगा. और फायनली कमर्शिअल नेक्स्ट मन्थ आना चाहिये.. चॅनेलवालोंके साथ मीटिंग फिक्स की है..'

'अरे बॉस  वो मॉडेलके सब टॅन्ट्रम थे.. चले गई शूट आधा छोडके..'

'आय हर्ड अ डिफरन्ट स्टोरी..'

'नथिंग ऑफ दॅट सॉर्ट..'

'आय वॉर्न्ड यू लास्ट टाईम.. वि कान्ट अफोर्ड टू लूज द बिझनेस..'

'यू कान्ट ट्रस्ट मी.. देन आस्क देवी. शी टू पार्टिसिपेटेड.  ऑर फरगेट..'

तो निघून गेला. देवी त्याची असिस्टंट.. म्हणजे उंदराला मांजर साक्ष...

विशूने स्वतःशीच मान हलवली, जुन्या आठवणी झटकण्यासाठी. सध्या हाच चाळा होता.

विक्रमला पुढे घालवावा लागला. मॉडेलशी फ्लर्ट करायचा. तिने कॉन्ट्रॅक्ट कॅन्सल केलं. तिला डिमान्ड होती. निघून गेली. मॉडेल कोऑर्डिनेटर त्याला सामील आणि देवीही.. विशूने त्याला आधीच वॉर्न केलं होतं. कोणी सरळ नव्हतेच ह्या फिल्डमधले..

त्यातच नंदिनी आजारी झाल्यापासून देवी जरा जास्तच जवळिक दाखवत होती. ती बहुतेक विक्रमला कव्हर देत होती. पण हे तेव्हां कळलं नाही. कळलं तेव्हां फार उशीर झाला होता.

मोहाचे क्षण आणि निसर्ग दोन्ही आपलं काम करून गेले....

तिकडे बिचारी नंदिनी एकटी आजाराशी झगडत होती. नि तिचा दुरावा सहन न होऊन कि काय तो मोहात फसला. आठ वर्षांच्या विश्वासाला त्याने धक्का दिला होता. रिलेशनशिप संपल्यातच जमा होती. त्यामुळे दुसरीकडे वहावत गेला.

कन्फेशनचा तो सीन त्याला अजून आठवत होता...

नंदिनी बरी झाल्यामुळे माँ देवळात गेली होती. विशू नंदिनीच्या बेडजवळ खाली मान घालून बसला होता. नंदिनीला अंदाज आला होता. कित्येक महिने जवळ असूनही दूर झालेला विशू काय सांगणार ह्याची तिला कल्पना आली.

ऑफिस सोडलं तरी कलिग भेटून जातच होते. अगदी देवयानीसुद्धा आपली प्रेग्नसी मिरवून गेली. विचारपूस करण्याच्या बहाण्याने! तिला खिजवण्यासाठी असं इतरांना वाटलं. तरी नंदिनीने तो विचार झटकून टाकला. ती त्याच्या पलिकडे पोहोचली होती!..

'नंदू डिअर जे झालं ते अपरिहार्य होतं. म्हणजे ह्या घटकेला तरी. पूर्वी कदाचित् टाळता आलं असतं.'

'ते जमलं असतंच असं नाही डिअर.. कारण मीच तुझ्यापासून किती दूर गेले. अर्थात फक्त शरिराने. मनाने मी अजूनही तुझ्यातच घुटमळते आहे. पाहूया देवी कसं निभावून नेते.'

'पण तुझी उणीव ती भरून काढील असं नाही वाटत. हे लग्न एक तडजोड म्हणून करावं लागलं. कदाचित् देवीने संधीचा फायदा घेतला असावा..'

'असं का म्हणतोस? आयुष्यातले ते क्षण तुम्ही पूर्णपणे जगलात. एकत्र येऊन. मी कायम अपूर्णच रहावं अशी कदाचित नियतीचीच इच्छा असेल! देवीला साथ दिलीस तर परिस्थिती आणि तीसुद्धा बदलेल कदाचित्.'

'प्रयत्न नक्की करीन. पण शक्यता कमीच वाटतेय्.'....

तेच खरं ठरलं!

विक्रम मग पुढे वर्षभरातच निघून गेला. फिल्मलाईनला गेला. असिस्टंट म्हणून. देवीलाही त्याची फूस होतीच. घेऊन गेला. चॅनेलच्या प्रॉडक्शन हाऊस कडे. कास्टिंग करतांना स्वतःच तिचं फिल्ड नसलेल्या ॲक्टिंगमधे गेली. पुढे त्यालाच काय, सगळयांना वाटलं होतं. तसंच झालं. ती कुठेच टिकू शकली नाही! तिच्याच उथळपणामुळे..

तेव्हां का कुणास ठाऊक पण वाटलं होतं कि पिडा गेली. पीडाच तर काय. एका चुकीमुळे कायमची गळयात पडलेली.

तिच्यामुळेच तर सरळसाध्या आयुष्याला एक वाकडं वळण लागलं. देवीशी झालेलं सोकॉल्ड लग्न हेच मुळात एक वाकडं वळण होतं. खरं तर टाळता आलं असतं. कानांवर हात ठेवून. नंदिनीसारख्या बाईशी संसार सुरू होण्याआधीच देवयानीसारख्या क्रिएटिव्ह असिस्टंटशी लग्न करावं लागणं हा त्याच्या दुर्दैवाचा भाग....

म्हणजे तशीच परिस्थिती निर्माण झाली. नंदिनीशी लग्न होताहोता राह्यलं नि आठेक वर्षाची रिलेशनशीप सोडून वयाची पस्तीशी उलटल्यावर कसं कोण जाणे घसरायला झालंच कदाचित् मुलाची गरज वाटायला लागली असावी. किंवा स्वतःत नसलेली उणीव त्याला जाणवायला लागली असावी. स्वतःला सिद्ध करण्याची संधी नंदिनी त्याला देऊ शकत नव्हती. दोष तिच्यात होता. म्हणूनच तर लग्नं लांबवलं होतं तिने. तो वहावत गेला. काय होतंय् हे त्याचं त्यालाच कळलं नाही...

दोष माहित असल्यामुळे नंदिनी नाखूष असली तरी रिलेशनमधली तिची उत्कटता कमी झाल्यासारखी वाटत नव्हती!

तसा पूर्वीच कधीकाळी ओव्हरीजवर सिस्ट वाढल्यामुळे धोका निर्माण झाला होता. पण तेव्हां तो तात्पुरता होता. आता त्याची पुनरावृत्ति झाली.

प्रॉब्लेम लक्षात आल्यामुळेच तर चेकअप केलं. काळजी वाटली कारण बायोप्सी रिपोर्ट नॉर्मल नव्हता. सिस्ट मॅलिग्नंट असल्यामुळे ऑपरेट करणं भाग होतं. पाठोपाठ केमो. धोका टळला पण केस गळलेला नि उतरलेला नंदिनीचा चेहरा पहावत नव्हता. मॉ नि सर्व्हन्टच्या मदतीने तिने निभावून नेलं. शिवाय ह्या प्रोसेसमधे खूप वेळ गेला....

पुढच्या सगळया शक्यता संपल्यातच जमा होत्या. प्रेग्नन्सीची शक्यता सोडूनच दिलेली. तरी हाच धोका परत होऊ शकत होता. मग तर सरळच

ऑपरेट करावं लागणार. हा खरं तर दोघांनाही जबर धक्का होता. तरी तिने ते सर्व लाईटली घेतलं. म्हणजे तसं दाखवलं तरी.

तिला बहुतेक हे अपेक्षित होतं. म्हणूनच कांहीतरी सबबी सांगून तिने लग्न लांबवलं असावं असं विशूला नंतर वाटायला लागलं....

दरम्यान मॉला बोलवावं लागलं म्हणून तिची रवानगी लेडीज हॉस्टेलमधून त्याच्या जुन्या छोटया फ्लॅटवर झाली. तिची काळजी घ्यायला म्हणून एकटीच रहाणारी मॉ कलकत्त्याहून आली. बिचारी नंदिनीच्या लग्नाच्या आशेनी आली नि हे सर्व ऐकून धास्तावली.

एरव्ही नंदिनीचा तिथला वावर नेहमीचा होता. कारण काळजी न घेताही कधी काळजीची परिस्थिती उद्‌भवली नव्हती. तेव्हांच तर सत्य कळलं. आता मात्र सारे संदर्भच बदलले होते.

हे सारं घडलं तरीही आशेला जागा होती. सरोगसीच्या माध्यमातून.. असं विशूला तेव्हां वाटलं होतं. केव्हांतरी नंदिनीशी तसं डिस्कसही केलं होतं.....

पण मग तडकाफडकी असा निर्णय का घेतला ते त्याला स्वतःलाही कळलं नाही. मुलाची घाई होती कि स्वतःची मानसिक गरज होती का ती केवळ एक पळवाट होती. देवीशी लग्न करण्यासाठी शोधलेली. कारण तिने ॲबॉर्ट करायला नकार दिला होता!

त्यामुळे लग्न झाल्यानंतर देवीची स्वतःची फारशी इनव्हॉल्वमेन्ट नसतांनाही सोना झाली. पण देवी सोनाची फक्त सरोगेट मदर ठरली. ती कशातच, अगदी सोनामधेही गुंतली नाही.

म्हणजे नंदिनीला अपेक्षित होतं तसंच झालं. फक्त त्यात तिचा सहभाग नव्हता आणि ते तिला खटकलंही नाही. कारण तोपर्यंत तिची ट्रिटमेन्ट संपली होती.

विशूची मदत होती तरी एव्हाना तिचा बॅंक बॅलन्स नील झाला होता तिने हिम्मतीने स्वतःची कन्सल्टन्सी सुरू केली होती. एका कॉमन ऑफिसमधे टेबलस्पेस हायर करून..

देवयानीच्या प्रकरणानंतर त्यांची रिलेशनशिप संपली तरी संबंध चांगले होते. कारण विशूने सोनाला नंदिनीच्या हवाली केलं होतं. मधूनमधून चेकअपला जावं लागे पण नंदिनीची तब्येत नॉर्मल होती.

'थॅंक गॉड..' विशू स्वतःशीच म्हणायचा...

पंधरा वर्ष होऊन गेली तरीही सोनाकडे पाह्यलं कि देवीची आठवण यायचीच. सोना मात्र देवीला केव्हांच विसरली होती. रॅदर देवी तिला फारशी आठवतच नव्हती. तिच्यासाठी नंदिनी तिची मॉ होती. खरंच होतं ते....

ती नंदिनीला ममा नि मॉला मॉ म्हणायची. ब-याचदा बंगालीतूनच संवाद व्हायचा.

'ओ मॉ खिदे पेएछी.. खाबार कि आछे.' (आई ग.. भूक लागलीय्. खायला काय आहे?)

'केनो?तोर टिफिन खावा होय नि?' (का?तुझा डबा खाऊन झाला नाही?)

'अरे ओरा शेष करेछे. आमी किछू पाईनी.'(त्यांनी संपवलं सगळं. मला कांहीच मिळालं नाही.)

तिच्याकडे रागाने पहात मॉ मग कांहीतरी खायला करून द्यायची. तिच्या रागातूनही डोकावणारी माया नंदिनीला दिसत होती. ती मग हंसून म्हणायची.'सोनू तू बहुत बदमाश हो गई है. मॉके हाथका खानेका बहाना ढूंडती है.'

'शोती बोलछी. (खरंच सांगते) दे ऑल फिनिश्ड माय टिफिन. मॉ गेव्ह मी लूची. दे फिनिश्ड...'

हजर असलाच तर विशू ही भाषेची सरमिसळ एन्जॉय करायसाठी म्हणायचा.

'सोना,तू मॉला मदत कर जा.'

'आमी नाय जा... भूख लगी है..'

हे सर्व मान हलवून थोडंच विसरता येणार होतं....

नंदिनीने सोनाची अगदी व्यवस्थित काळजी घेतली. स्वतःच्या मुलीसारखीच. मॉ तिच्या देखभालीसाठी दाखल झाली होती. पण तिला मग दोघींची देखभाल करणं भाग पडलं. खरं तर मनाविरूद्धच. फारसं पसंत नसूनही मॉने नंदिनीखातर सोनाला स्वीकारलं होतं. मधूनच नंदिनी चेकअपला जाऊन आली कि मॉइतकाच विशूही हळवा व्हायचा. त्या हळव्या अनामिक भीतिने त्यांना एकत्र बांधून ठेवलं होतं. फ्लॅट सोडण्याचा नंदिनीचा विचार मात्र विशूने उडवून लावला.

त्याला नंतर वाटायला लागलं कि देवयानीला त्याचं आकर्षण होतं कि पैशांच? कि प्रसिद्धिचं? हे त्याला कधी कळलंच नाही. जातांना तिने सोनाला नेलं नाहीच नि तिला भेटायलाही कधी फिरकली नाही. सोना लहान असतांना एखाददा चुकूनमाकून भेटली तर. एरव्ही तिचा मुक्काम दिल्लीतच....

देवयानी मूळ गुजराती. ह्या फिल्डमधे कशी आली कोण जाणे. मॉडेल कोऑर्डिनेटरमुळेच विक्रम घेऊन आला असेल. क्रिएटिव्ह टीममधे काम करण्याएवढी तिची कॅपॅसिटी नव्हतीच. तरी इम्प्रेशन मारून गेली. कारण ती अपेक्षेपेक्षा जास्तच मॉड निघाली.

विशूला कधी कधी गंमत वाटायची. तो सुरवातीला नंदिनीच्या म्हणजे बंगाली मुलीच्या प्रेमात पडला. म्हणजे पूर्वेकडच्या. थोडफार आकर्षण वाटत होतं म्हणूनच.

नंतर पश्चिमेच्या म्हणजे देवयानी ठक्करच्या जवळ आला. एक ठाकूर नि दुसरी ठक्कर. योगायोगाचं आश्चर्य वाटायचं कधी कधी. पण उगवतीचा प्रकाश अजून टिकून होता..

त्याच्या आयुष्यातनं गेल्यावरही देवी भरकटतच राह्यली. एकदोन सीरियल झाल्या. विक्रमजवळ लिव्ह इन झालं नि मग सरळ दिल्लीलाच गेली. त्याला डिच्ड करून. तिला कोण लिगल ॲडव्हायझर भेटला कोण जाणे. त्याच्या सल्ल्यामुळेच तिला भलंमोठ कॉम्पेनसेशन द्यावं लागलं.

नंदिनीच्या समजूतदारपणामुळे आधीचं सगळं सहज जमून गेलं होतं. तिला कसलीच अपेक्षा नव्हती. प्रेमाशिवाय!

ह्या बयाला मात्र फ्लॅट द्यावा लागला. नवा फ्लॅट.. आऊट ऑफ कोर्ट सेटल् करायसाठी. कारण तिने कृएल्टीचा चार्ज लावला होता. केव्हांतरी ड्रिंकमुळे हात उचलला होता. त्याची किंमत म्हणून. तरीही सोनाला मात्र ठेऊनच गेली!

मग मात्र त्याला पुन्हा नंदिनीकडेच यावं लागलं. स्वतःच्याच जुन्या घरी....

पडल्या पडल्या अशा किती आठवणी चाळवल्या जायच्या. आता त्याचा कांही उपयोग नाही हे माहित असूनही. आता वयाची पन्नाशी उलटल्यावर ब्लॉकेजेस काढले नि पुढच्या आयुष्याचा बोनस पदरात पाडून घेतला तरी नंदिनीला काय दिलं? फक्त मनस्ताप आणि वर जबाबदारी सुद्धा. नकळतच त्याच्या पापण्या पाणावल्या.

पडून नि विचार करून कंटाळा आला होता. हळूहळू भोवती अंधारही वाढत चालला होता. मॉ तिच्या खोलीत कायतरी स्तोत्र गुणगुणत असावी. नंदिनी डायनिंग टेबलजवळ कायतरी काम करत होती बहुतेक. सोनाची वाट पहात. ती आली कि मायलेकींच्या तीन पिढया एका खोलीत बडबडत बसतील..

नंदिनीने त्याला हॉस्पिटलमधून सरळ इकडेच आणलं होतं. त्याच्या घरी नोकरावर सोपवायला नको म्हणून.

त्याची सोय नंदिनीच्या खोलीत नि मग त्या तिघी एका खोलीत.. त्याला डिस्टर्ब होऊ नये म्हणून केलेली योजना....

सहज यावं तसं येत नंदिनीने लाईट ऑन केला. बेडवर मागे सरकून टेकून बसलेल्या विशूने चट्‌कन डोळयांवर हात घेतला. नंदिनीने बोलून दाखवलं नाही तरी तिच्या लक्षात आलं कि हा जरा इमोशनल झालाय्. जुन्या आठवणींमुळे. तिने लाईट ऑफ केला. तिला गलबलल्या सारखं झालं. त्याच्या तब्येतीकडे पाहून. पन्नाशी उलटल्यावरही रोज न चुकता व्यायाम करून कमावलेलं शरिर आता अर्ध झालं होतं.

स्वतःला सांवरून अंधारातच त्याने डोळयांवरचा हात काढत विचारलं.

'येस डिअर..'

'कांही नाही. आराम कर. तब्येत किती खालावलेय् तुझी.'

'होईल ठीक. तू वेळेवर जेवण, औषधं देतेसच. त्यात सारखा आराम करून मग कोलॅस्टरॉलच्या गोळया घ्यायची वेळ येईल कदाचित्.'

'पुन्हा चेकअपला जाऊ तेव्हां लाईट एक्झरसाईजबद्दल विचारू.'

'माझ्याबरोबर तुझीही रजा झाली.'

'सेलफोन नि लॅपटॉप कशाला आहे मग. माझी असिस्टंट टचमधे असतेच नेहमी.'

'सोना क्लासमधून आली? तिचा अभ्यास बघायला तुला वेळच होत नाहीय्.'

'क्लास आहेच ना. पण आज जरा उशीर झाला तिला.'

ती असं म्हणतेय् तो बेल वाजलीच.

मॉने मेनडोअर उघडल्याबरोबर सोनाचा थयथयाट नि मॉचं ओरडणं कानांवर पडलं नि विशू नंदिनीकडे बघून हंसला.

'आता तुला कॉल येईल बघ..' तो म्हणतोय तोवर मॉची हांक आलीच.

'ओ गो नोंदिनी.. भाईरे आय.. तेरी बेटी मेरा कुछ सुनती नै..'

हंसत नंदिनी बाहेर गेली नि बघते तो आरडाओरड करणारी सोना डायनिंग चेअरवर बसलेल्या मॉच्या गळयात पडलेली.

'मॉ. कि खाबो आमी?'( काय खाऊ मी. )

'तोर ममी देबे.' ( तुझी ममी देईल. )

'ममी भूख...'

'आय नो. गो ॲन्ड हॅव अ वॉश.' असं म्हणत नंदिनीने सॅन्डविच बनवायला घेतलं.

'ओरे बाबा.. आजभी सॅन्डविच.. टिफिनमेभी वोईच..'

'सोना लॅन्ग्वेज प्लिज..'

सोना पाय आपटत रूममधे गेली..

'बाबा. केमोन आछेन.. ममी सॅन्डविच बना रैली है. आमी खाबो ना..'

'सोना व्हॉट लॅन्ग्वेज डू यू टॉक. बना रैली काय. सरळ हिंदी नाहीतर मराठी बोल. आणि दुसरं काय करणार? ममी किती दमून जाते. डू यू नो दॅट?'

'दमून जाते मिन्स टायर्ड?'

'येस. शी केअर्स फॉर एव्हरीवन. नॉट लाईक दॅट वूमन.' विशू उद्वेगाने बोलून तर गेला..

'सॉरी बेटा.. आय डिडन्ट मीन टू हर्ट यू..'

'आय ॲम नॉट हर्ट बाबा.. शी डिझर्व्हज् दॅट.'

थोडं थांबून मग म्हणाली..'वन्स शी केम अक्रॉस ॲन्ड इंट्रड्यूस्ड हरसेल्फ. मी रिॲक्ट नाय केला.'

'व्हॉट? व्हेअर डिड यू मीट हर?' विशू चकित झाला..

'शी ऑफर्ड मी लिफ्ट.. आय रिफ्यूज्ड..'

'व्हेअर?'

'समटाईम बॅक क्लासजवळ भेटला. एन्क्वायर्ड अबाऊट यू.. शी सेड शी केम टू डिस्पोज हर फ्लॅट..'

'हर फ्लॅट? ब्लडी बिच...' विशूचा ताबा सुटला..

आत येणा-या नंदिनीने ऐकलं.

'विशू डिअर. कूल डाऊन. हॅव सम रिस्पेक्ट फॉर हर. शी इज सोनाज मदर.'

'ओ नो. ममी.. आय डोन्ट बिलिव्ह इट.. यू लूक्ड आफ्टर मी.. तूच माझा मॉम..'

ती मग इमोशनल होत नंदिनीला बिलगली. तिच्या पाठीवर हात फिरवत नंदिनी म्हणाली.

'हे बघ बेटा. थिंग्ज कॅनॉट चेंज. तू भट आहेस. सोनाली भट. आणि मी? माझी आयडेन्टिटी काय? मी मिस नंदिनी ठाकूर..'

हा संवाद ऐकून विशू अवाक् झाला!

'तिची आयडेन्टिटी! हे आपल्या कधी लक्षातच आलं नाही..'

'दॅट मेक्स नो डिफरन्स. तुझी आयडेन्टिटी... माझी ममा. ऑल माय फ्रेन्डस् नो दॅट.'

ती नंदिनीला अधिकच बिलगली. विशूचेही डोळे भरून आले. कारणं कांही असोत पण आपण तिला तिचं स्थान दिलंच नाही कधी.

'वेट अ मिनिट.' असं म्हणत झटका आल्यासारखी सोना बाहेर गेली. आत आली तेव्हां तिच्या हातात करंडा होता.

तो उघडून विशूकडे देत ती म्हणाली..

'वूड यू माईन्ड बाबा.. प्लिज..'

दोघंही अवाक् होऊन पहातच राह्यले. ह्या कालच्या अवखळ पोरीला जे कळलं ते आपल्याला कधी का नाही कळलं.'

'वूड यू माईन्ड नंदू डिअर?' यांत्रिकपणे करंडा हातात घेत विशूने विचारलं. भोवतालच्या त्या अर्धवट उजेडात!

इतक्यात देवांजवळचा करंडा घेऊन आलेल्या सोनाच्या पाठून मॉ आत आली नि तिने स्वीच ऑन केला. समोरचं दृष्य बघून तीही भारावली.

नंदिनी पुढे झाली. बेडवर बसल्या जागी उठून विशूने तिच्या भांगात सिंदूर भरला. सोनालीने टाळया वाजवल्या.

त्या दोघांना अगदी धन्य वाटलं. सोना मग त्या दोघांना बिलगली नि भारावलेल्या मॉने आपला लांब पदर उजव्या खांद्यावरनं पुढे ओढून डोळे टिपले.. बाहेर अस्ताला गेलेल्या सूर्याचा लाल प्रकाश पसरलेला. कुठूनतरी मशीदीची बांग ऐकू आली.

मॉला एकाएकी शंख वाजल्यागत वाटलं. तिंने मग तोंडात उजव्या पंजाची तर्जनी उलटी घालून दुर्गापूजेला करतात तसा एक आवाज काढला. शुभशकूनाचा उलूकध्वनि. आता तो परिवार परिपूर्ण झाला!

फोनची रिंग वाजली. नंदिनीने तिथलाच रिसिव्हर उचलून स्पीकर ऑन केला.

'येस..'

'मी प्रमोद वाघ बोलतोय. सॉरी टू बॉदर मिस. पण आता तरी मी सरांशी बोलू शकतो का?'

'यू कॅन स्पीक टू मी.'

'आपण. मिस ठाकूर  ना?'

'नो नो. मी मिसेस भटच बोलतेय्. यू कॅन गिव्ह यूअर मेसेज.'

फोन डिस्कनेक्ट झाला! ते तिघंही एकदम जोरात हंसले. ते का हंसले ते न कळल्यामुळे गोंधळलेली माँ स्वतःशीच हातवारे करत नि बडबडत बाहेर गेली.

'बामून नेई, बाजा नेई. आमार मेये बिये कोरेछे!' (ब्राम्हण नाही, बाजा नाही. माझ्या मुलीने लग्न केलं! )

खरंच. हा जगावेगळाच विवाह होता.... मुलीच्याच साक्षीने झालेला सोहळा!!

तिकडे रिसिव्हर हातात धरलेला प्रमोद वाघ मात्र विचार करत राह्यला.'ठाकूर कि भट?'..

***

ॐ

.. अय्या..

दक्षिण मुंबईतल्या भरगच्च ट्रॅफिकच्या त्या रस्त्यावर सिग्नलपाशी वाट पहात असल्यासारखा थांबलेल्या बाबूलला पलिकडच्या फुटपाथकडेनी जाणारी ती गर्दी दिसली.

डोक्याला रूमाल बांधलेले किंवा गोल टोप्या घातलेले लोक दर दोन पावलांवर खांद्या बदलत हिरव्या रेशमी चादरीने झाकलेला नि फुलांच्या चादरीने मढवलेला जनाजा घेऊन निघालेले दिसले. ते लोक मोठयाने कांहीच बोलत नव्हते.

पण त्याला उगाच'जयराम श्रीराम' म्हटल्यासारखा भास झाला. जायचंय् सगळयांना एकाच ठिकाणी. माती काय नि राख काय!

स्वतःशीच विचार करत रस्ता क्रॉस करून मग तोही डोक्याला रूमाल बांधत त्यात सामील झाला. आपला उजवा अधू पाय वेळावून टाकतांना मधेच थांबून तो शोधक नजरेनी पहायला लागला. पण सहज नजरेत यावा असा उंचापूरा उस्मान कांही दिसला नाही. वाटलं.. असेल मागे. येईल.....

उस्मानची दादी गुजरल्याचं त्याचाच वर्कशॉपमधे फोन आला तेव्हां कळालं.

'अरे बाबूल तेरे दोस्तका फोन आया था.' सुपरवायझर घडियालीला त्यांची दोस्ती माहित होती

'क्यूँ क्या हुआ?'

'अरे उसकी दादी गुजर गई.'

'तब्बीच. मेरेकू लगा उसको लेट हो गया होंगा.'

'दोपरके नमाजके बाद जनाजा उठेंगा बोलता. किसीको जाना चाहिए था.'

'आप जाएंगा?'

'वोईच मुष्किल दिखता. मेरी मशीनपेबी जॉब लगा है. तुमने शुरू नै किया होंगा तो तुम जाओ ना.'

बाबूलला हवं तेच झालं.

'किदर जानेका? घर जानेको तो लेट होंगा.'

'कितना दूर है... शिवडीही तो जानेका है. तू एक काम कर तू सिद्धा नारियलवाडी चला जा. व्हॉंच जनाजा पौचेंगा तब शामिल होना. उसको हात मिलाना. बास. हम बादमें मिल लेंगे. '

शेवटी उस्मानच्या घरी जायला जमलं नाहीच. तेवढा टाईम नव्हता. निदान इथेतरी त्याला भेटावं म्हणून बाबूल त्या नाक्यावरच थांबला. सिग्नलची खूण उस्माननेच सांगितलेली.

त्याला वाटलं'आपण खांदा दिलेला चालेल का नाही कोण जाणे. कदाचित आतही जायला मिळायचं नाही.'

त्या लोकांची चाल मंदावली. तेव्हां तोही त्या गर्दीत मिसळला. त्याच्या लक्षात आलं कि कबरस्तान इथेच कुठेतरी असावं. बहुतेक डाव्या हाताला जुनं फर्निचर मांडून ठेवलेल्या त्या लांबलचक भिंतीच्याच पालिकडे. एवढया वेळात तिकडे लक्षच गेलं नव्हतं.

लक्ष होतं ते सिग्नलजवळ अलिकडच्या फूटपाथवर पाय बांधून आडव्या केलेल्या बैलाकडे. त्याच्या वहाणा-या डोळयातले करूण भाव त्याची असहाय्यता सांगत होते. दोन माणसं त्याच्या बाधलेल्या पायांच्या खुरांना नाल ठोकत होती. निर्जिव लाकडावर खिळे ठोकावेत तशी. त्याला ती कसायासारखी वाटली. तो एकदाच सुरी चालवतो. ही माणसं ठोकतच होती.

त्याच्या मनात विचार आला'जनाजामधे विसावलेल्या दादीच्या सुकलेल्या निर्जीव देहाला काय काय सुगंधी उपचार दिले असतील. म्हणजे उस्मानच्याच भाषेत तिच्या'रूहला सुकून' मिळावा म्हणून कि निर्जिव शरिराला दुर्गंधी येऊ नये म्हणून कोण जाणे.

मरणाचा हा असा सोहळा!

तिच्या जिवंतपणी तर सगळा आनंदच असणार. वर्कशॉपच्या पगाराच्या ओढगस्तीत काय नि कसं जमवत असेल उस्मान!

दणादणीत शरिराचा उस्मान कायम टेन्शनमधे असल्यागत. बहुतेक पैशांच्या ओढगस्तीमुळे.

त्यामुळे त्याचा गोराभुरका चेहरा नेहमीच केविलवाणा दिसायचा. ह्या जीवासारखाच..

ह्यालाही कसल्या दिव्व्याला सामोरं जावं लागतं आहे. पुन्हा उभं रहायलं कि वजन ओढायचंच आहे. नवीन नाल ठोकलेले खूर घसरत असतील तरीही.'

पोलिओचा अधू पाय लोढण्यासारखा वेळावून टाकण्यात बाबूल मागेच रहात होता. जनाजावाली गर्दी त्या आडव्या भिंतीतल्या गेटाजवळ आली तसा तो मागच्या मागेच थांबला. समोर आल्यावर उस्मानला दिसेल असा उभा रहायला. तो आल्याचं उस्मानला दिसावं म्हणून.

मग वाटलं..

'उस्मान पुढे गेला असेल तर कसा गांठायचा त्याला.. नंतर जाऊया का घरी.. आपला जीवाभावाचा मित्र. पाठच्या भावासारखाच. लंगडा पाय संभाळून काम करतांना त्याची नेहमीच मदत व्हायची. हेल्पर होता तरी लेथवर जॉब लावला कि बाजूला असायचाच. मदतीला. घडीयाली फारसं बोलायचा नाही. कारण त्यालाच कायतरी मदत लागायची. बिचारा उस्मान आपली नेहमी चौकशी करत असतो.'

उस्मान दिसल्यावर त्याला सामोरा जात बाबूल म्हणाला.

'माफ करना उस्मानभाई. घर नही आ सका. लेकिन बहोत बुरा हुआ यार...'

'हां भाई.' चालताचालता तो एवढंच बोलू शकला. त्याचे डोळेच बोलले. त्या आडव्या झालेल्या बैलासारखेच. करूण..

'बादमे मिलना.' आत जाताजाता उस्मानच बोलला.

'हां इदरीच रूकता मै.' तो उस्मानला म्हणाला खरं पण मग त्यालाच वाटलं कि..

'एवढा वेळ थांबून करणार काय. रस्त्याकडे पहात नुसतंच उभं रहायचं. विचार करीत.

गेलेल्या दादीचा कि उस्मानचा?'....

मघा उभा असलेल्या सिग्नलजवळच अलिकडच्या फूटपाथकडेला बांधकामाच्या परातीचे बांबू ढीग करून ठेवलेले दिसले. ते न्यायसाठी बाजूला हातगाडी ठेवलेली होती. तो पुन्हा क्रॉस करून मग त्या हातगाडीवर जाऊन बसला.

मुबईत आल्या आल्या माव्याबरोबरच लागलेली बापाच्या विडीची तलफ आतल्या आत जिरवतांना त्रास व्हायचा.'आये' म्हणजे बापाची म्हातारी गेल्यावर त्याला गांवाला पाठवून बाबूल मुंबईत येऊन राह्यला. तेच काम करायला.

गांवाकडे खोकत बसलेला बाप पेज कमी नि विड्याच जास्त प्यायचा. त्याला पाह्यलं होतं तरीही तलफ मारायची बाबूलच्या जीवावर यायचं. तलफ दाबून ठेवतांना त्याला मग काय काय आठवायला लागलं.....

ह्या उस्मानचा त्याच्यासारखाच तगडा अब्बू कधीकाळी दुबईला होता म्हणे. तो काय काम करायचा कोणालाच माहित नव्हतं. उस्मानलासुद्धा.

'बचपनमे अब्बू बहोत चाहता अपनेकू. दुबाईसे क्या क्या लेके आता अपनेवास्ते और अम्मीके वास्तेभी.' उस्मान आठवून आठवून सांगायचा. फारच कमी गोष्टी आठवायच्या त्याला. कारण तो लहान असतानाच त्याच्या अब्बूचा म्हणे'एन्काउन्टर' झालेला. पोलिसांकडून. अम्मी पोलिस स्टेशनला नि नंतर कोर्टात चकरा मारायची. तिला कुठून पैसे मिळायचे त्याला कळायचं नाही. पण बरेच दिवस हा सिलसिला चालू होता. झालं कांहीच नाही पण त्याची शाळा मात्र चालू रहायली. अम्मी म्हणायची;

'दुष्मनने बदला लेनेवास्ते तेरे अब्बूको किसी केसमे फँसाया और बादमें पोलिसवालोंसे तेरे अब्बूका एन्काउन्टर करवाया.'

उस्मानला वाटायचं;'हे सगळं अम्मीला कसं कळायचं? कोण सांगायचं? कसली दुष्मनी नि कोणाशी? कसला बदला?' हे त्याला तेव्हां कळणं शक्य नव्हतं. हे सगळं अम्मीला खूपच त्रासाचं झालं. म्हणून दादी मुलखातून येऊन राह्यली. शिवडीसारख्या वस्तीत. म्हणायची...

'बापजैसा तूभी बूरी संगतमे मत जा. जानसे हाथ धोना पडेगा.'

'म्हणजे अब्बू वाईट संगतीत होता?'

तेव्हां त्याला कांहीच कळलं नव्हतं. पुढे कळलं कि अब्बू दोन नंबरवाली कामं करायचा. ड्रगसारख्या मालाची नेआण वगैरे.. त्यात भरपूर कमवायचा.

'लालच बूरी चीज है बेटा. खतरेमे डालाच न तेरे बापकू.''दादी म्हणायची.

तिला खरं तर उस्मानच्या अम्मीचा राग होता असंही तो म्हणायचा. घरात भांडणं झाली कि उस्मान विश्वासाने सगळं सांगायचा. अब्बूच्या त्या भाई लोकांकडून अम्मीला खूप पैसे मिळून तिने ते दाबून ठेवल्याचा दादीला संशय होता बहुतेक. कारण केससाठी तिने बरेच पैसे खर्च केले होते.

शिवाय त्याच्या  अम्मीचा निकाह झाला नव्हता असंही कांहीसं दादी म्हणे ते मात्र उस्मानने ऐकलं होतं.

'बेहया! अपने खाविंदको छोड आई.' असंही  उस्मानने ऐकलेलं. वाटलं'त्यांची मोहब्बत पाक असावी. कि पक्की असावी?'

दादीचे तानेबाने ऐकूनही अम्मी कधी कांही उलट बोलत नसे. भांडण म्हणजे दादीचीच एकतर्फी बडबड.

अब्बू असतांना फारसा कोणाच्याच वाटयाला यायचा नाही. विशेषतः दुबई सोडून आल्यापासून तो दुस-या कसल्या धंद्यात अडकला हे त्याच्या अम्मीला उशीराच कळलं. सारखा बाहेर जायचा. म्हणजे बाहेरगांवी असं अम्मी सांगायची. गांवच्या बिब्बीला फक्त पैसे पाठवायचा पण तेही दादीच्या मागण्यावरून केव्हांतरी.

त्याची आधीची बिब्बीबच्चे दादीजवळ मुलखात होते नि उस्मानची अम्मी दुसरी बिब्बी. तिच्या संसारावर पैसा उधळला म्हणूनही कदाचित् दादीला तिचा राग असेल. पण ती उस्मानचा मात्र कधी राग करायची नाही. त्याच्या अब्बूने खूप पैसा कमवला नि उधळलाही. कसले कसले शौक करून.

अम्मीमुळेच उस्मान शाळेत मात्र रखडत कसाबसा नववीपर्यंत गेला. मग वडाळयाच्या त्या वर्कशॉपमधे लागला. हेल्पर म्हणून. लेथवरचं काम अजून शिकत होता. आता अम्मीला ते लोकं पैसे थोडेच देणार होते! काम करायलाच हवं होतं. हे सगळं तुटक तुटक असं उस्मान कधीकधी सांगायचा म्हणून कळालेलं.....

उस्मानच्याच विचारात गुंतलेल्या त्याच्या मग लक्षात आलं कि'या दाढीसारखीच आपली पण आये होतीच कि. बापाची म्हातारी.'

बापाचं ऐकून तो आज्जीला आये म्हणायचा. आईला मात्र बोलायला लागल्यापास्नं 'अय्या' म्हणायला लागलेला असं त्या आयेनेच सांगितलेलं. पण फारच थोडे दिवस. कारण 'अय्या' त्याच्या लहानपणी अजाणत्या वयातच गेल्याचं आयेकडूनच ऐकलं होतं!

पुढे गांवभर तेच तिचं नांव झालं. अगदी शिवीसारखं. बाबूलचा बापही शिवी देतांना तेच नांव घ्यायचा. बाबूलला पुढे ती घरातून निघून गेल्याचं कळलं तेव्हां त्या शिव्यांचा अर्थ कळला.

'आयेनेच लहानपणापास्नं आपल्याला संभाळलं. आईवेगळं पोर म्हणून. आपल्या तोकडया नि अधू पायाच्या उस्तवारया करीत.'

अगदी लाडाकोडात शक्य नव्हतं. घरचे फक्त तांदूळ. तेही बाप पावसाळयात मुंबईत कामं नाहीत म्हणून घरी यायचा तेव्हां कष्टाला उभा रहायचा म्हणून मिळायचे. बाकीचं सारं आये बघायची. एरव्ही बाप आठ महिने रंगाचा डबा घेऊन गोल देवळाजवळ उभा रहायचा. मिळालं तर काम मिळायचं. तेही वेगवेगळया मुकादमाकडे. कॉन्ट्रॅक्टर सांगेल तसं मुकादम त्यांना वेगवेगळया ठिकाणी घेऊन जायचे. लांबसुध्दा. मग जेवणाचाही पत्ता नसायचा. सुतारगल्लीतल्या जुन्या चाळीत गांववाल्यांच्या खोलीवर पैसे देऊन रहायचा. त्याचं कुटुंब गांवाला गेलं कि त्याला आठवतसुध्दा नसलेल्या त्या अय्याला बाप घेऊन जायचा. जेवण बनवायला. एकदा तर'तान्हा असतांना अय्या त्यालाही घेऊन गेलेली.' असं आये म्हणाल्याचं त्याला आठवत होतं. एरव्ही जमतील तसे पैसे पाठवायचा. अय्या मग धुसफूस करायची. तिला शहराची चटक लागली असंही आये म्हणायची.

'काय रांडू मुरडता पावडरी लावन. तेका भज्या खावची चटक. हंय गांवाकडेन् पेज खावची पडता. जाएत एक दिवस हात धरून कोणावांगडा. लक्षान काय बरा नाय तेचा.' आये तेव्हां बाबाला सांगायची.

हे सगळं नंतर केव्हांतरी त्या बापाकडूनच ऐकलेलं. तो लोकांशी पाव्हण्यांशी बोलतांनाच. बेसावधपणे. एरव्ही तो मुद्दाम कांही सांगत नसे. कधी विचारलं तर तो एक सुस्कारा सोडायचा. जाणत्या वयात मग लोकांचं ऐकून कळालं ते एवढंच कि ती 'अय्या' घरातून निघून गेलेली. कुठे ते बापालाही कळलं नाही. पण एकदा मुंबैत असतांना तिला बिगारीकामाला नेलं होतं. नि नंतर दोनच दिवसात ती गायब झाली. बहुतेक नागपाडयाच्या शेटकडे काम चाललेलं असतांना. त्याच्याच कुणा माणसाबरोबर असेल.

'आये म्हणायची तसं चटक भागवायसाठी;गरीबीला कंटाळून कि आपल्या पायाच्या दुखण्याला?

बापाला म्हणे मुकादमाने सल्ला दिला कि पोलिसांच्या भानगडीत पडू नको. ती लोकं चांगली नाहीत. शिवाय ती जर आपल्या मर्जीनेच गेली असेल तर बदनामीच.'

बाप तेव्हांपासून अय्याबद्दल बोलतांना फक्त सुस्कारे सोडायचा. म्हाता-या आयेच्या शिव्या चालूच असायच्या. थोडंफार गांवातल्यांनी ताडलं नि कांही विचारायचं सोडून दिलं. म्हातारीच्या तोंडाला कोण लागणार....

तो हातगाडीवाला दोन बिगा-यांना घेऊन आला नि त्यांनी बांबू काढायला सुरवात केली तशी बाबूलला कुल्ले झटकीत उठावंच लागलं.

'जावं का आता? ह्या लोकांना खूप टाईम लागणार मूठमाती द्यायला. शिवाय नंतर वर्कशॉप मधल्या पोरांना घेऊन जावंच लागेल. तेही शिवडीला! उस्मानच्या घरी आपण कधीच गेलो नाही. बघू जमलं तर जाऊ.'....

एवढयात फरर्र फरर्र असा विचित्र आवाज आला नि बाबूल  तंद्रीतनं जागा झाला. तो उभा होता त्या सिग्नलवरनं वळून एक मिरवणूक येत होती. वाजतगाजत.

जाडजूड लाल युनिफॉर्मचे डगले नि कॅप घातलेले ब्रासबॅन्डवाले घामाने निथळत मधेच विचित्र आवाज काढून त्या क्लॅरिओनेटवाल्याच्या चांगल्या गाण्याची वाट लावत होते. ऐकू येत होता तो फक्त ड्रमचा ठेका.

मिरवणूक वळून त्या भिंतीसमोर आल्यावर आधी दिसले ते मागे अनवाणी चालणारे मुनिश्वर नि पांढरे कपडेवाले त्या समाजाचे लोक. बॅन्डपासून ब-याच अंतरावर चालत होते. मागोमाग जर्मन सिल्वरचे पत्रे ठोकलेल्या एका अवाढव्य रथाचं आणि आतल्या उपासवाल्या महिलांचं कमी झालेलं वजन पेलत आणि कडक ऊन झेलत एक खेचराएवढया उंचीचा पण झूल घालून सजवलेला 'घोडा' पाय ओढत चालला होता. त्याच्यासारखाच. घोडयाच्या डोळयांवर झापडं. त्यामुळे बाबूलला लांबून दिसलं नाही पण बहुदा त्या बैलासारखाच तोही पाणावल्या डोळयांनीच ओझं ओढत असावा असं वाटून गेलं.

ओझं वहाणा-यांचे डोळे पाणावलेलेच!

ती गर्दी पुढे सरकली नि इकडे तशाच घळघळत्या डोळयांनी वेदना सोसणारा बैल उठून  उभा राह्यला. बाजूलाच उभ्या असलेल्या उसाच्या मोळयांनी भरलेल्या गाडीला जोडण्यासाठी. फक्त एकच बरी गोष्ट दिसली ती म्हणजे त्याच्या मालकाने गाडीखाली लोंबकळणा-या  गोणपाटांच्या खोळीत ठेवलेली दोन चिपाडं बैलापुढे केली वेदनेची भरपाई म्हणून लाच दिल्यासारखी!

आता पुढे गु-हाळांवरनं मोळया टाकित नि चिपाडं गोळा करीत जायचं. चाबूक नाही तरी मालक चिंबल्या चिपाडांचे फटके द्यायचाच. तो तरी बिचारा काय करणार होता. पोटासाठी मार्केटमधून माल घेवून मोठी फेरी करायची आणि गोळा केलेली चिपाडं गाडी अडडयावरच्या रॉकेलच्या गाडीवाल्यांच्या बैलांसाठी नेवून द्यायची. चार पैसे त्याचेही सुटावे म्हणून.

दोन वेगवेगळया मिरवणूका नि वेगळाच माहौल. सोहळे. एक मरणाचा नि दुसरा?... मिरवत मोक्ष मिळवू पहाणारयांचा. म्हणजे खरं तर जगण्याच्याच चिवट इच्छेचा.

बाबूल सुन्न झाला. उस्मानचा तो केविलवाणा चेहरा मात्र त्याच्या लक्षात राह्यला नि बैलाच्या डोळयातून सांडणारी वेदना. आणि नुकत्याच पाह्यलेल्या त्या घोडयाचीही....'

दोन दिवशी तो मग जोडीवाल्यांना घेऊन शिवडीला गेला. पहिल्यांदाच. रेल्वेलाईन जवळच्या झोपडपट्टीत. तिथला वेगळाच माहौल.

पक्क्या झोपडीच्या छपरावर लोखंडी ॲंगलच्या आधारावर उभ्या असलेल्या माळयावर उस्मानचं घर. खालच्या भिंतीला टेकून असलेल्या लोखंडी शिडीवरनं घरात जायचं. गल्लीतल्या पोरांनी घर दाखवलं तशी खालच्या घरातली एक वयस्कर बाई दाराशी आली.

'कोन होना भाय?' तिचे हैदराबादी हेल.

कोणी उत्तर दिलं नाहीच. शिवाय घडीयाली नि दुसरा एकजण शिडी चढायलाही लागले होते.

'आलोच आहोत तर भेटायला तर पाह्यजेच.' ,

बाबूल जोडीवाल्याला बोलला. ते ऐकून नि त्या पोरांनी खालनं आवाज दिल्यामुळे लुंगी लावलेला उस्मान उघडया अंगाने त्या पत्रयाच्या दाराशी आला. हातात शर्ट घेऊन. कोणी येईल अशी कल्पना नसल्यामुळे थोडा अवघडल्यासारखा झाला. दाढी वाढलेली. चेहराही उतरलेला. पण त्याचाही इलाज नव्हता.

वर गेल्यावर कोप-यात एका ग्लासात वात लावलेली दिसली. बाबूलला वाटलं; ' चालीरिती शेवटी सगळीकडे सारख्याच.'

पण खरा धक्का बसला तो पत्र्याच्या भिंतीवर लावलेल्या तसबिरी बघून. एकात काबाच्या फोटोखाली काळया मखमलीवर कुराणाच्या आयता जरीने भरलेल्या. पण बाजूलाच हिंदूंच्या गांवठी देवाच्या तसबिरीसुध्दा. विरोबा चांडकाई सारख्या. बाबूल चक्रावला पण कांही बोलला मात्र नाही.

घडियाली रितीचं बोलत होताच.

'बहोत बिमार थी क्या?'

'नै. मामुली बिमारी.... उमरबी थी.'

'अल्ला करे उसको सकून मिले..'

'इन्शाल्ला.. ऐसाच हो.'

'अब तू एकलाच है ना.'

'नै. मेरी अम्माबी है. नीचे पानी भरती होगी. अब्बीच पानीका टैम है ना.'

'तेरा अब्बू तो पैलेच अल्लाको प्यारा हो गया ना..'

'भोत पैले... जब मै बिल्कुल छोटा था.'

'घडीयालीसाब अब हमको चलना पडेगा. नै तो गाडीमे भीड होंगी.'चुळबुळत बाबूल बोलला.

'हां रे. चलते फिर..'

तो एवढं बोलतोय तो शिडीजवळ उभ्या असलेल्या खाली रहाणा-या त्या वयस्कर शेजारणीचा आवाज आला. ती कुणा पोराला सांगत होती.

'अरे रसूल. वो अय्याको बुला ला. बोलना घरमे मेमान लोगां आया और..'

'वो आतीच होंगी. तूबी ना खाला.. खामखा..  वो देख आ गई उस्मानकी अम्मा..'

रसूल कंटाळल्यासारख बोलला.

'किदरको गई थी तू अय्या? तेरेको मालूम नै मय्यत होनेपर लोगां मिलनेको आताच ना.'

'क्या करें. पानी तो लगेगाच ना.'

'तो मेरेसे लेनेका दो बाल्डी. मेरा टीप भरा पडा है ना.'

'अब जाके देखती कोन है...'

'तू इदरीच ठेर अय्या. अब मत जा उप्पर. मरदलोगां है. क्या मालूम क्हांसे आया. परदा तो तू करतीच नै.'

'अय्याभाबी तुम अंदर आके बैठो. मै रसूलके हाथ चाय भेज देती.'

खालाची सून आतून बोलली. पण ती वेळ आलीच नाही. खालून ऐकू येणारा संवाद ऐकता ऐकता अस्वस्थ झालेला बाबूल उठून शिडीजवळ आला तो ती बाई खालाच्या घरात गेली. ते तिघेजण मग खाली येणा-या उस्मानला हात दाखवून जायला वळले. उस्मान शिडीवरच राह्यला नि त्याची अम्मा खालाच्या घराच्या दाराशी आली.

'कोन लोगां थे वो उस्मान?' त्या खालाचा सवाल. दादीकडनं ऐकल्यामुळे तिला भीति होती कि हा उस्मान'बूरी संगतमे फॅस तो नही गया!'

'मेरे कारखानेसे आए थे. तू किदर थी अम्मा. मेरे वो दोस्तसे मिलवाना था.'

'कौन दोस्त..'

'वोईच. मै बोलता ना वो बाबूल मेरे भाई जैसा है.'

'गए क्या वो लोग..'

'हां वो क्या जा रैले है. वो सफेद दाढीवाला मेरा फोरमन. और वो दूसरा वो लंगडाते चलता वो मेरा दोस्त बाबूल. दादीको कंधा देने आया था नारियलवाडीमे.'

जरा निरखून पहात नि कांहीतरी आठवल्यासारखं करत अम्मा बाहेर आली तो मोहल्ल्याच्या टोकाकडे असलेल्या मशिदीतून संध्याकाळच्या नमाजाची अजान आली. मग संवयीप्रमाणे झट्‌कन डोक्यावरचा पदर पुढे घेत पसरून तिने आभाळाकडे पाह्यलं; दुआ मागितल्यासारखं. का ते दाराशी आलेल्या खालाला कळलं नाहीच नि उस्मानलाही.

दिसले ते तिचे घळघळून वहाणारे डोळे!....

वळून पाह्यचा मोह टाळून पुढे चालत राह्यलेल्या बाबूललाही रहावलं नाहीच.

'एकदातरी.. फक्त एकदाच.' असं स्वतःशीच म्हणत तो वळला तो शिडशिडीत बांध्याची ती''अय्या'' आभाळाकडे पहात पदर पसरून दुआ मागत होती. भरल्या डोळयांनी. त्याला ते ओझं ओढणा-या बैलाचे वहाणारे डोळे आठवले.

ती'अय्या'ही ओझंच ओढत असावी. पश्चात्तापाचं? तिलाच ठाऊक!....

बाबूल भरून पावला. आता तो शांतपणे पुढे निघाला. आपलं ओझं ओढायला....

©©©

